— हिंदुस्थानची —

# सामाजिक उत्क्रान्ति

(१७९०-१९४०)


लेखक :

दत्तात्रय रामचंद्र कानेगांवकर,

एम्. ए.






किंमत २ रुपये

स्वाधीन साहित्य संस्था लिमिटेड, पुणें २

तीर्थरूप

रा. रा. रामचंद्र नरसिंह कानेगांवकर

यांचे चरणीं—

याच लेखकाची—प्रकाशित

- मराठीचिये नगरीं—भाग १ला
  (दुसरी आवृत्ति)
- गुलामगिरी
- महात्मा गांधी
- महात्मा चक्रधर
- फसला बिचारा !



आगामी—याच लेखकाची

- रामजोशी-चरित्र व काव्यसंग्रह
- मराठीचिये नगरीं, —भाग २रा
- सुगम रामायण
- मराठ्यांच्या बखरी

# कांहीं आधुनिक समाज सुधारक

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | राजा राममोहनरॉय | १७७४ जन्म | | मृत्यू |
| २ | स्वामी दयानंद सरस्वती | १८२४ " | १८८३ | ,, |
| ३ | पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर | १८२० ,, | १८९१ | ,, |
| ४ | लोकहितवादी | १८२३ ,, | १८९२ | ,, |
| ५ | न्यायमूर्ति रानडे | १८४२ ,, | १९०१ | ,, |
| ६ | प्रिन्सिपॉल आगरकर | १८५६ ,, | १८९६ | ,, |
| ७ | दादाभाई नौरोजी | १८२५ ,, | १९१७ | ,, |
| ८ | विष्णूबुवा ब्रह्मचारी | १८६४ ,, | १९२० | ,, |
| ९ | महात्मा फुले | १८२८ ,, | १८९० | ,, |
| १० | के. टी. तेलंग | १८५० ,, | १९१३ | ,, |
| ११ | डॉ. भांडारकर | १८३७ ,, | १९२५ | ,, |
| १२ | लो. टिळक | १८५६ ,, | १९२० | ,, |
| १३ | विष्णूशास्त्री चिपळूणकर | १८४९ ,, | १८८२ | ,, |
| १४ | डॉ. आनंदीबाई जोशी | १८६५ ,, | १८८७ | ,, |
| १५ | बेहेरामजी मलबारी | १८५३ ,, | १९१२ | ,, |
| १६ | महात्मा गांधी | १८७० ,, | | |
| १७ | महर्षी कर्वे | १८५८ ,, | | |

# संदर्भ ग्रंथ


## चरित्रें

| | | |
|---|---|---|
| १ | लो. टिळक चरित्र भाग १ | ले. श्री. न. चिं. केळकर |
| २ | दादाभाई नौरोजी | ले. प्रा. ना. सी. फडके |
| ३ | विष्णूशास्त्री चिपळूणकर | |
| ४ | गोपाळ गणेश आगरकर | ले. प्रा. मा. दा. आळतेकर |
| ५ | न्यायमूर्ति रानडे | ले. प्रॉ न. र. फाटक |
| ६ | पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर | ले. श्री. पां. स. साने |
| ७ | लोकहितवादी | ले. प्रा. ग. ह. केळकर |
| ८ | डॉ. आनंदीबाई जोशी | ले. सौ. कानिटकर |
| ९ | डॉ. भांडारकर | ले. श्री. द्वा. गो. वैद्य |
| 10 | Raja Ram Mohan Roy | By Mr. D. N. Ganguli |
| 11 | Swami Dayanand | ,, ,, Bawa Arjan Sing |
| १२ | स्वामी विवेकानंद भाग १ ते ९ | |
| १३ | महात्मा गांधींचें चरित्र | |
| १४ | स्वामी दयानंद | ले. श्री. तुंगार |
| 15 | Swami Dayanand His life & teachings | |
| 16 | Raja Ram Mohan Roy | |

## इतर ग्रंथ

| | | |
|---|---|---|
| 1 | History of the Congress | ले. श्री. पट्टाभिसितारामय्या |
| २ | आधुनिक भारत | ले. आचार्य जावडेकर |
| ३ | अर्वाचीन गद्याची पुर्वपीठिका | ले. प्रा. गं. बा. सरदार |
| ४ | महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी | ले. ,, ,, |
| ५ | अर्वाचीन महाराष्ट्र | ले. श्री. टिल्लू |
| ६ | आजकालचा महाराष्ट्र | ले. श्री. पाध्ये, श्री. टिकेकर |
| ७ | केसरी प्रबोध | |
| ८ | निबंधमाला | ले. विष्णुशास्त्री चिपळूणकर |
| ९ | लो. टिळकांची व्याख्यानें | |
| १० | प्रार्थना समाजाचा इतिहास | ले. श्री. द्वा. गो. वैद्य |
| ११ | पुणें शहराचें वर्णन | ले. श्री. ना. वा. जोशी |
| १२ | लोकहितवादींचीं शतपत्रें | |
| १३ | स्वामी विवेकानंदाचीं पत्रें | |
| 14 | Indian National Evolution | By Mr. Ambika Charan Muzumdar |

# हिंदू-समाज



१७९०–१९४०



१ जित असल्याने न्यूनगंड

१ धार्मिक–सामाजिक [१८०५–१८२८] → २ धार्मिक कल्पनांविरुद्ध बंड

२ सामाजिक–राजकीय [१८२८–१८५६] → ३ श्रद्धेपेक्षां बुद्धिप्रामाण्यावर विश्वास

३ राजकीय–सामाजिक [१८५७–१९००] → ४ समाजसत्तावादाचा विचार

४ राजकीय–आर्थिक [१९००–१९४०] → ५ आधुनिक राष्ट्रवादाचा प्रस्ताव

६ 'जित' असूनही अहंगंड

# वर्ण्य विषय

**(अ) धार्मिक :—**

१ सती

२ यज्ञोपवीत

३ मूर्तिपूजा

४ श्राध्द

५ कर्मकांडांचा विध्वंस

६ धर्मांतर

७ शंकराचार्यांचें महत्व

**(ब) विवाह विषयक :—**

१ विधवा विवाह

२ बाला-जरठ विवाह

३ बालविवाह

४ अनेक विवाह

५ संमतिवयाचा कायदा

६ हुंडा

**(क) स्त्रियांचे हक्क व इतर**

१ स्त्रीशिक्षण

२ ब्राह्मणांचें वर्चस्व

३ इंग्रजी कीं संस्कृत

४ दागिन्यांची घातक चाल

५ स्त्रिया इस्टेटीच्या भागीदार

६ औद्योगिक शिक्षण

७ स्वदेशी

# विषय-प्रवेश

इ. स. १७९० ते १९४० पर्यंतच्या दीडशें वर्षांतील समाज सुधारकांच्या जीवनावर घडलेले परिणाम या छोट्या निबंधात सांगण्याचें ठरवलें आहे. प्रत्येक पुढारी पुरुषाचे वा स्त्रीचें चरित्र घेऊन त्यांच्या जीवन—पथावर काय काय गोष्टी घडल्या व त्या घडत असतांना त्यांना सामाजिक कार्य करण्याची स्फूर्ती कशी मिळाली हे वेगळे न पाहता त्या सर्वांच्या चरित्राचे समग्र अवलोकन करून त्या त्या काळीं घडलेल्या गोष्टी का घडल्या, त्याचीं धोरणें कोणतीं, हे साकल्याने विचार करताना त्यात या समाज—धुरीणाचा संबंध आणून त्याच्या चरित्रातले धागेदोरे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. समष्टी-दृष्टया हें परीक्षण केले असल्याने व्यक्तीचे विवेचन सामग्र्याने दिलेले नाहीं. ज्या काहीं व्यक्तींचे येथे प्रमुख्यान वर्णन केलें आहे, त्या त्या व्यक्तींची यादी प्रारंभीं दिलेली आहे. शिवाय इतरही लहानसहान व्यक्तींचा प्रसंगोपात्त उल्लेख करावा लागला तो केलेला आहे.

एकंदर हिंदुस्थानच्या दृष्टीने धार्मिक, सामाजिक व राजकीय या त्रयी तून गेलेल्या उत्क्रांतीचाही हा धावता चित्रपट जणू रचलेला आहे. यांत मुख्यतः सामाजिक कार्यकर्तेच चमकताना दिसतात. राजकीय पुढारी, जें सध्या मिरवले जातात ते, बहुशः झाकलेले सामाजिक पुढारी या नांवानेंच मागल्या काळीं संबोधिले गेले असते. कारण, सध्यांच्या राजकीय विचारांचा प्रवाह अगदीं पूर्वीपासून म्हणजे राजा राममोहनांपासून तो तहत महात्मा गांधींपर्यंत एकसारखा सलग दिसतो. त्यांत कोठेही खंड नाहीं. फरक इतकाच कीं राजा राममोहनाच्या वेळीं या हिंदुस्थानांतील एकंदर विचार प्रवाहाचा वरचा थर सामाजिक भासे, पण खालच्या थराला तो राजकीयच होता. पहाः लोकहितवादी—“ देशसुधारणा क्षणात होत नाहीं. तीस पुष्कळ विलंब लागतो ” [१] तो प्रवाह आतां उघडपणें राजकीय म्हणून वाहात आहे. प्रवाहाचे रूपक सोडूनच बोलायचे झाल्यास १०० वर्षांपूर्वींचे झांकलेले राजकीय सुधारकच प्रकट सामाजिक सुधारक होते तर त्या नंतरचे पुढले

---

[१] लोकहितवादी–केळकर पृ. ८७

प्रकट राजकीय पुढारी असून झांकलेले सामाजिक क्रांतिकारक आहेत म्हणजे हा फक्त उलटापालटीचा प्रश्न आहे !

मात्र या पुस्तकांत वर्णन करतांना पूर्वीच्या म्हणजे १९०० सनाच्या पूर्वीच्याच सुधारकांचा थोडा जास्त विचार केलेला आढळेल. तसेच सुधारणेचे धार्मिक, वैवाहिक व सामाजिक असे तीन भाग कल्पून त्यांतील वेगवेगळ्या बाबींवर प्रत्येकाने काय काय खटपटी केल्या, त्या करण्यांत त्यांचा काय हेतु होता व तसे करण्यात त्याच्यावर त्यांच्या काळाचा काय परिणाम झाला हें विशद करण्याचा प्रयत्न केला आहे व म्हणूनच हा विषयवार असा समाजाच्या उत्क्रांतीचाच इतिहास आहे, असे म्हणण्यास हरकत नाहीं.

राजकीय लढा पुढाऱ्यांनीं हाताळावयास सुरवात केली असें जेव्हां दिसतें तेव्हा तो या विषयाच्या बाहेरचे म्हणून त्याचा विचार केला नाहीं. राजकीय विचारांचीं आंदोलनें वर्णन करण्याचें हे ठिकाण नव्हे, म्हणून संयम दाखवावा लागला आहे. पण लेखकाचे हें ठाम मत आहे कीं, सामाजिक व राजकीय असें दोन प्रकारचे पुढारी हिंदुस्तानात आहेत किंवा होते असे नसून सगळेच पुढारी त्या त्या काळाला बांधले गेले असल्यानें आपणास असे भेद आहेत असे वाटतात. तेव्हांची त्यांचीं दृष्टी जर Socio-Political (सामाजिक–राजकीय) असली तर आताच्यांची ती Politico-Social (राजकीय–सामाजिक) आहे असे फार तर म्हणावें म्हणजे सगळ्या पुढाऱ्यांत एकविचाराचा धागा ओंविलेला आहे असे दिसेल. रंग मात्र अधूनमधून निराळा !

इतर धर्मपंथाचाही इतिहास पाहूं जाता ते जुन्याशींच फार चिकटणारे अतएव अधोगामी वाटले. फक्त हिंदुधर्म व त्यांच्यातील समाज-सुधारणा यांचाच विचार करावा लागला. तसा मधून एकाददुसरा शीखपंथाचा अगर जैनधर्माचा उडता उल्लेख आलेला आहे. पण हिंदुस्थानांतील एक मोठा धर्मपंथ जो इस्लाम, त्यांच्यातील उठावणी मात्र या पुस्तकांत आलेली नाहीं. त्यांच्यातहीं जुन्यालाच चिकटुन राहण्याची प्रवृत्ती फार दिसून येते. असो. याप्रमाणे लेखनास घेतलेल्या विषयाचा प्रपंच करण्याचें मी ठरविलें आहे.

# अनुक्रमणिका

## विचारप्रवाह, कार्य व वर्ण्यविषय

# प्रकरण १ लें

## ' जित व जेते अशी भावना : १८५७ व आधीं '

## ' प्रथम बंगाल व त्यामुळें न्यूनगंडाची भावना '

हिंदुस्थानांत ब्रिटिश व्यापाऱ्यांचा पाय मुंबई-मद्रासपेक्षां कलकत्याच्या हुगळी नदींतून आंत शिरला व तो तेथेंच प्रथम घट्ट रोंविला गेला. तेव्हां इंग्रजाकडून जिंकले गेलेले अतएव जित लोकांची भावना बंगाल्यांतच प्रथम निर्माण झाली. प्लासीच्या लढाई नंतर, क्लाइव्हने जी बंगालची दिवाणगिरी पत्करली त्या योगें इंग्रजांचे प्रभुत्व बंगाली लोकांस प्रथम अनुभवावयास मिळालें व प्रथम प्रथम तरी ते बंगाली लोकांस मानवलें. इंग्लिश लोकांच्या न्यायदानपद्धतीवर व राज्याच्या घडीमाप शिस्तीवर बंगाली लोक खूष झाले. मुसलमानी रियासतींत होणाऱ्या अन्याय, जबरदस्ती, जुलूम इत्यादींवर इतके दिवस न मिळणारा नवीन उपाय सापडला याच आनंदांत ते होते. बंगालमध्ये, ही जी राज्यक्रांति झाली ती, सर जे. सी. सीले म्हणतो याप्रमाणें, ती ' अंतर्गत राज्यक्रांती ' होती ! इंग्रज लोकानीं या राज्यक्रांतीला कारणीभूत होऊन हातभार लावला व पुढे ती राज्यक्रांति पचवली. एवढेंच नव्हे तर सगळ्याचा सगळा देश साम्राज्याखालीं आणला. हिंदुस्थानाला परकी अमलाचा अनुभव नव्हता असें नाहीं. फार पूर्वी पासून सुद्धां—अगदीं शक, हूण, बर्बर, यांच्या टोळधाडी पासून हिंदुस्थानचे लचके कित्येकांनीं तोडले आहेत. मुसलमानांनीं तर येथें येऊन आपलें साम्राज्य स्थापिलें व तें अव्याहत ५००-६०० वर्षे चालवलें. तेव्हा परकी सत्तेखालीं राहण्याची संवय इथल्या लोकाना होती. मग मुसलमान जाऊन त्या जागीं इंग्रज आले तर इथल्या लोकांत इतका फरक वाटण्याचे कारण काय ? मुसलमानांनीं जे इथल्या लोकांना जिंकल ते तरवारीच्या व क्रौर्याच्या जोरावर ! तरवार लटकी

---

[1] आधुनिक भारतावरून

पडल्यावर राज्यशासनाच्या बाबतींत ते अनभिज्ञ असल्यानें इथल्या फुटीर लोकांच्या मदतीवरच त्यांना राज्याचा गाडा हांकावा लागला. शिवाय मुसलमान राज्यशास्त्यांचा धर्म मुळांत परकी जागेंत रुजणारा नव्हता. जुलूम जबरदस्तीनें अगर लालचीने जितके बाटवतां आले तितके लोक त्यांनीं बाटवले. पण हिंदुधर्माचा पाया भक्कम असल्यानें त्याला मुसलमान धर्मशास्त्रापुढें मान वांकवावी लागली नाहीं. व त्यामुळेंही जिंकलेपणाची भावना त्यांचें ठिकाणीं उत्पन्न झाली नाहीं. सामाजिक बाबतींत पाहिलें तरीही हिंदूंना मुसलमानांपासून घेण्यासारखें असें कांहीं नव्हते. या सर्व कारणांनीं मुसलमानांनीं जरी भौतिक सामर्थ्यावर हिंदूना जिकले होतें, तरी पुढें मनाची मिळणी झाल्यावर दोन्ही धर्म एकत्र नांदण्यास प्रत्यवाय उरला नाहीं. याशिवाय आणखी एक मोठे कारण या राज्यक्रांती मागें होतें तें हें कीं, मुसलमानांनीं येथील देश काबीज केल्यावर त्यांना आपल्या स्वतःच्या मातृभूमीची आठवण झाली नाहीं व तिच्यासाठीं एथील आर्थिक शोषणही त्यांचेकडून झालें नाहीं. ‘ जिंकलेला तो आपलाच ’ अशी त्यांची वृत्ती होती. या सगळ्या परिस्थितीपेक्षां इंग्रजांनीं जी राज्यक्रांती केली ती फारच निराळी होती. ते सर्व दृष्टींनीं परके. रंग, धर्म, देश, भाषा, समाजपद्धती, चालचलणूक, ही त्यांची अगदीं नवीन. त्यांचा आपल्या मातृभूमीकडे ओढा. राज्यशासनाची त्यांची पद्धती अभिनव. न्यायदानाची रीत निःपक्षपातीपणाची, लष्करी आक्रमण कामापुरतें. त्यांत क्रौर्याचा व निष्ठुरतेचा तितकासा भाग नाहीं. या सगळ्या गोष्टींनीं इकडच्या लोकांना त्यांच्या विषयीं एक प्रकारचें औत्सुक्य ! आधीं, कोणीही जिंकले तरी जेत्याविषयीं जितांना नेहमीं भीतिपूर्ण औत्सुक्य असतेंच. एवढे कशाला ? मुसलमानी लोक प्रथम जेव्हां जेते म्हणून आले, तेव्हा कांहीं ते इथल्या लोकांपेक्षा सामाजिक बाबतींत पुढारलेले नव्हते पण त्यांच्या देखील चाली, निव्वळ ते जेते होते म्हणून आपल्या लोकांनीं नाहीं कां उचलल्या ? गोषाची पद्धत तर याची साक्षच आहे ! पोशाखसुद्धा किती तरी बदलले ! यापेक्षां देखील गमत म्हणजे आमच्या इक

डील भटजी, आपलें सबंध नांव सांगतांना मुसलमानी थाटाची मांडणी करूं लागले व फारशी भाषा वापरूं लागले. 'धोंडोभट बिन् कृष्णंभट' असें नांव लिहिणे हें काय दर्शवतें ? तेव्हां, ज्याच्या जवळून शिकण्यासारखे कांहीं नाहीं त्यांची देखील नक्कल करावी अशी जितांची जेथे भावना झाली आहे तेथें विद्या, राज्यशासन इत्यादी बाबतींत जे खरोखरच श्रेष्ठ आहेत त्या इंग्रजांनीं जिंकल्यावर येथल्या लोकांना त्यांचेविषयीं आदर वाटावा यांत काय नवल ! जेते जें करतील तें चांगलें, ते वागतील तसे वागावे, ते घालतील तसे कपडे घालावे, ते बोलतील तसे बोलावे असेच सर्वांना वाटूं लागलें व एकदां हें खूळ पिकल्यावर तें कोठें थांबेल हे सागतां येणार नाहीं. असे सांगतात कीं, डॉ. भांडारकर कॉलेजमध्यें असतांना त्यांच्या बरोबर शिकत असलेल्या विद्यार्थ्यानें इंग्रज लोकांप्रमाणे आपण हाताने दाढी तर करतोंच पण त्याच्याही पुढें जाऊन इंग्रजावर ताण करतो हें दाखवण्यासाठीं दाढी करण्याकरितां घेतलेलें व साबणानें फेसाळलेलें पाणी पिऊन दाखवले ! जेत्यांची नक्कल करण्याची ही परमावधी झाली ! सर्व साधारणतः पाहता अशी भावना महाराष्ट्रांत फार उशीरां आलेली होती. पण बंगाल्यांत इंग्रजांचा अंमल बसून पुष्कळ वर्षे झाली असल्याने त्यांच्या ठिकाणीं ही जिताची भावना फार मोठ्या प्रमाणांत दिसून येते. म्हणून प्रथमतः बंगालमधील जी मंडळी पुढारी म्हणून निघाली त्यांच्यामध्यें हा न्यूनगंड फार मोठ्या प्रमाणावर दिसून येतो. राजा राममोहन राय हे सर्व सुधारणा-वाद्याचे अग्रणी ठरतात. त्यांचीही दृष्टी ब्रिटिश सत्तेनें दिपून गेल्यासारखी दिसते. त्यांनीं लॉर्ड ॲमहर्स्टला पाठविलेल्या पत्रांतील एकदोन उद्धृतच जरी पाहिलीं तरी त्याची खात्री पटल. 'इंग्रजी शिक्षण हिंदुस्थानांतील लोकांस द्यावे कीं संस्कृत' असा वाद निघाला असतांना इंग्रजीच शिक्षण हिंदुस्थानांतील लोकांस द्यावे या मताचे राजा राममोहन राय हे होते व याच कारणांसाठीं त्यानीं हें पत्र लॉर्ड ॲमहर्स्ट–तेव्हांचे व्हाईस रॉय, यांना पाठवलें आहे त्या पत्रांत ते म्हणतातः—

"While we looked forward with pleasing hope to the dawn of Knowledge, thus promised to the raising generation,

our hearts filled with mingled feelings of delight and gratitude, we already offered up thanks to Providence for inspiring the most generous and enlightened nations of the west with the glorions ambition of planting in Asia the arts and science of Modern Europe." *

इंग्रजी राज्यकर्त्यांच्या राज्यशासनाच्या नुसत्या नाविन्यालाच राजा राममोहन राय भुलले नव्हते तर युरोपीय जें सगळें तें चांगलें व युरोपियनांचा आशियांतील लोकांबरोबर जो संबंध घडवून आला आहे तो यदृच्छेनें घडून आला नसून ती 'ईश्वरेच्छा' होती असे त्यांचें मत होतें. युरोपीय ज्ञानाचीं भांडागारें वाङ्मयरूपानें जीं आपल्या इकडील लोकांस त्यांच्या संघर्षणानें उघडीं झालीं त्याबद्दल तर राजा राममोहनांनीं त्यांची स्तुती केलीच आहे. एका अर्थी ती बरोबर आहे. आपल्या इकडील अध्यात्मिक ज्ञानाला त्याच्या चिरपरिचितत्वानें व त्याच्या चर्वितचर्वणानें लोक कंटाळत चालले होते व तेंच ज्ञान जर पुनः पुनः या लोकांना पाजण्यांत आलें तर यांची धडगत नाहीं असेंच वाटून " The sanskrit system of education would be the best calculated to keep this country in darkness " असें त्याचें प्रामाणिक मत होतें. पण जेत्यांचे वर्णन करतांना पोंच न राहिल्यानें स्तुतीचा हा लेखक फार मोठे झोंकें घेतो आहे असें वाटतें. "इंग्रजामध्ये कितीएक चांगले गुण आहेत. ते तुम्हास प्राप्त व्हावे म्हणून ईश्वरानें ही तुमची त्यांची संगत घातली आहे हें लक्षांत ठेवा" [१] असे या सर्वांचें उघड मत होतें.

महाराष्ट्रांतील लोकांस इंग्रजी सत्तेचा अनुभव फार उशिरां आला व अगदीं पहिली पिढी, कीं जिने राज्यकारभार स्वतः हांकिला होता त्यांना मराठ्यांचें राज्य गेल्याचें फार दुःख झाले. जुन्या पिढीचा कणखर पीळ अजून सुटलेला नव्हता. राज्यक्रांति होऊन पेशवे यांचे जागीं टोपीकर कसे आले यांचे गूढच त्यांना उमगेना. इंग्रजांनीं केलेली राजकीय क्रांति त्यांच्या

* Raja Ram Mohan Roy—By D. C. Ganguli

१ लोकहितवादींची शतपत्रें–शतपत्रांचा इत्यर्थ पत्र १००

परिचयाची नव्हती. त्यांची धाक दाखविण्याची व गोडीगुलाबीनें वागण्याची पद्धतीही विशेष होती. पुण्यास नवीनच अम्मल जारी झाल्यावर येथील लोकांनीं थोडीशी हालचाल केली. त्याना वाटले की पुणें व सातारा येथील युरोपियनांची कत्तल उडवावी, ठळक, ठळक किल्ल्यांवर छापा घालावा, सातारकरांस हस्तगत करावें—हे हेतू सिद्ध होण्यास जो कट झाला होता त्याचा तात्काळ समाचार घेण्यांत आला—एल्फिन्स्टनसाहेबांनीं त्यांतील म्होरक्यास—त्यांत असलेल्या ब्राह्मणांस—मराठी शासनपद्धतीप्रमाणें तोफेच्या तोंडी देऊन क्षणांत यमसदनास पाठवून प्रजाजनांस धाक दाखविला. [१] ही अशी शिक्षा तर जरब दाखविण्याकरितां केली पण त्यावर समजावणीचा उपायही त्यांचा कसा गंमतीचा आहे पहा कीं, त्या तऱ्हेची शिक्षा आपण फिरून कोणास देणार नाहीं, अशा आशयाचा निर्भय लेख एल्फिन्स्टन साहेबांपासून तेव्हांचें मुंबईचे गव्हर्नर सर इव्हॅन नेपियर यानीं मात्र मागितला. [२] मुसलमानी किंवा प्रसंगविशेषीं पेशवे दरबारकडून दाखविण्यांत येणारी राज्यशासनापुरती क्रूरता इंग्रज दाखवीत. पण प्रजेला कुरवाळून तिच्यांत भेद करण्याचेंही इलम त्यांना अपूर्व साधलें असल्यानें, नवीन नवीन, इथले लोक त्याना भाळले. इंग्रज सरकारचा अम्मल झाल्यावर पुण्यांतले लोकांस त्यांनीं किमपीही इजा दिली नाहीं व दुसरेही राजाकडून इजा बसली नाहीं ! [३] अशा प्रकारचा विश्वास लोकांत उत्पन्न करावयाचा अशी त्यांची इच्छा होती पण पहिली पिढी मात्र या आमिषाला बळी पडली नाहीं. बाजीराव कसा का असेना तो ‘ आपला ’ राजा आहे अशी भावना त्या लोकाची होती. एवढेच नव्हे तर ज्या एल्फिन्स्टन साहेबांच्या हातावर बाजीरावानें राज्याचे उदक सोडलें ते एल्फिन्स्टन साहेब देखील ‘ बाजीराव साहेबानीं कितीही अपराध केले असते व कितीही दगलबाजी केली असली तरी ते राज्यकारभार सोडून देतील तर मला त्यापासून फार दुःख होईल. ’ [४] असें दुःखोद्गार काढीत ! तर आमच्या

---

[१] अर्वाचीन महाराष्ट्र—दुल्लु--पृष्ठ ७. [२] कित्ता. [३] पुणें शहराचे वर्णन. ना. वि. जोशी पृष्ठ ६९. [४] अर्वाचीन महाराष्ट्र.

लोकांस त्यांच्या विषयीं प्रेम वाटल्यास नवल नाहीं ! ' कित्येकांनीं तर नियम केले होते कीं, बाजीराव जर परत येईल तर आम्ही अमुक गोष्ट करूं न येईल तर करणार नाहीं.' या जुन्या पिळदार पिढीच्या पुढची पिढी व काहीं त्यांच्या वेळची सुद्धां फुटीर मंडळी, मात्र जेत्यांचे कोड कौतुक करण्यांत अहमहमिका मानीत होती. त्या वेळचे एक गृहस्थ म्हणतात:—' त्या सालां-तील लोक जर या काळीं जिवंत असते तर त्यांस असें झालें असतें कीं या इंग्रजांस कोठें ठेऊं आणि कोठें न ठेऊं.' [१] आणि असें त्यांना कां वाटतें याचें कारणही त्यानें पुढें दिलें आहे कीं ' कारण सुखानें राहून भाकर खाणें आणि दुःखांत पंचपक्कान्न खाणें यांत किती मतभेद आहे तो यांस पुरता समजला असतां.' [२] तेव्हां या नवीनांना आपण जिंकलें गेलों आहोंत याची खिन्नता न वाटता पुष्कळ वेळां अभिमानच वाटत गेला आहे. मात्र कांहीं कांहीं लोकांच्या या बोलण्यांत त्रागा आहे असेंही वाटतें. ' लोकहितवादी ' रा. ब. देशमुख हे या पंथांतील दिसतात. त्यांनीं जरी इंग्रजाचें व त्यांच्या राज्यपद्धतीचें गोडवे गाइले आहेत तरी तसे गोडवे गाण्यांत आपल्या लोकांच्या मनांत ' ईर ' उत्पन्न व्हावी व त्यांच्यांत लगोलग सुधारणा व्हाव्या असा पीळ दिसतो. प्रा. माटे यांनीं ' केसरी-प्रबोधा 'मध्यें लोकहितवादींच्या विरुद्ध विना-कारण गैरसमज पसरविल्यासारखा दिसतो. ते म्हणतात " हे लोकहितवादी परकीयांच्या अंमलाची घडी चापून चोपून बसविण्याच्या उद्योगांत सामील झाले होते." [३] पण आमच्या मतें ते इतके वाहवलेले नव्हते. आपली विपन्न-स्थिती पाहून त्यांचें मन हलून जात होतें व त्यामुळेंच त्यांच्याकडून इंग्रजांच्या स्तुतीपर एकाद दुसरा जास्त गौरवपर शब्द गेला असेल. त्यांना जर आपल्या लोकांचा हिणकसपणा दाखवावयाचा असतां तर त्यांनीं आपल्या उद्धाराचे उपायही सुचवले नसते. ' इंग्रजांनीं आपले शहाणपणानें राज्य काबीज केलें आहे...हे (आपले लोक) परम आळशी आहेत व अज्ञानेंकरून महान्ध आहेत...त्यांच्या मध्यें शहाणे इंग्रज राज्य करतात हें जसें एक गुराखी

---

[१] पुणें शहराचें वर्णन पृष्ठ ५९. [२] कित्ता. [३] केसरी प्रबोध ३.

असला कीं १०० गुरें हांकतो...सारांश अक्कलही सर्वांपेक्षां जास्त आहे." [१] शतपत्रांचा इत्यर्थ म्हणून लिहिलेल्या पत्रांत त्यांनीं आपल्या लोकांस मनापासून उपदेश केला आहे. तो पाहिल्यास लोकहितवादी अराष्ट्रीय होते असें म्हणतां येणार नाहीं. लोकहितवादी हे महाराष्ट्रांतील आद्य सुधारक होते. त्यांना कदाचित भविष्यकालासंबंधीं फार मोठा अंदाज बांधतां आला नसेल पण त्यांनीं परकीय सत्तेचे पाश आपल्या भोंवतीं घट्ट आवळले असें म्हणणें सयुक्तिक होणार नाहीं. रा. ब. रानडे यांच्या सारख्या दूरदृष्टी समाजसुधारकाला देखील जेथें इंग्रजांचा संबंध दैवी देणगी सारखा वाटला, तेथें लोकहितवादींनी थोडेसें त्राग्याने लिहिलें त्याच्या अर्थाचा विपर्यास होऊं नये. आपण जिंकलेले अतएव आपल्या ठिकाणीं दोष आहेत ते आपण काढून टाकावे अशी भावना खुद्द रानड्यांची होती. असो. अशा प्रकारें महाराष्ट्रांत देखील ही जित-जेत्याची भावना लोकांचें ठिकाणीं जोरांत न्यूनगंड उत्पन्न करीत होती.

इतर प्रांतांत पाहूं गेल्यास मद्रासकडे सुद्धां इंग्रजांचा व परकीयांचा प्रवेश फार पूर्वींपासून झालेला होता. व एकपरी तेथील लोकांना स्वत्वाची जाणीव या पूर्वींपासून झालेली नव्हती. त्यामुळें जित्यांची भावना ही त्यांच्या परिचयाची, नव्हे अंगांशीं भिनून गेलेली होती. त्यामुळें इंग्रज आले काय अगर दुसरे कोणी आले काय त्याची त्यांना क्षिती नव्हती. उलट राजभाषिक होऊन प्रथम प्रथम मिळणारा नोकरवर्गाचा फायदा मात्र त्यांनीं घेतला. महाराष्ट्रांत प्रथम जेव्हां इंग्लिश अधिकारी वर्ग नेमला गेला त्या वेळीं डेप्युटी कलेक्टर जे दोघे असत त्यांत एक मद्रासी असावयाचाच. [२]

---

[१] लोकहितवादी शतपत्रें—पत्र २६. [२] अर्वाचीन महाराष्ट्र--दुस्क.

# प्रकरण २ रें

## वाङ्मय, व्यापार व धाडस यांमुळें नवयुगाला आरंभ:

गेल्या प्रकरणांत इंग्रजी राज्य असल्यानें आमच्या इकडील पुढाऱ्यांच्या मनावर त्याचे जे परिणाम झाले त्याचें विवेचन केलें. आतां परक्यांच्या संसर्गानें आमच्या इकडच्या वाङ्मय, व्यापार व इतर धाडसी मनोवृत्तींवर कोणता परिणाम झाला त्याचा विचार करूं.

परके लोक कांहीं हिंदुस्थानांत इंग्रजापूर्वी आले नव्हते असे नाहीं. पण इंग्रज कांहीं बाबतींत इथल्या लोकांपेक्षां श्रेष्ठ होते हें उघड आहे. या त्यांच्या गुणापैकीं वाङ्मय, व्यापार व धाडसीपणा हा आमच्या लोकांत बिलकूल नव्हता. अगदीं पेशवाईच्या शेवटच्या काळापासून पाहिलें तर वाङ्मयाचे नांवानें अिकडे अगदीं ठणठणाट होता. लहानपणापासून मुलांच्या समोर ज्या प्रकारचें वाङ्मय आणलें जातें त्यावरून त्यांच्या मनाचा विकास पुढें होत जातो. संस्कृत भाषेंतील ग्रंथरचना बंद झाल्यापासून प्राकृतांत पुनः लिहिण्याची विशेश तसदी कोणी घेतली नाहीं. जें जुनें होतें तें घोकून पठण करण्यापलीकडे लोकांची मजल गेली नाहीं. लहान मुलांचे घरचें शिक्षण संस्कृत पद्धतीप्रमाणें अगदीं जुजबी असे. वृत्ति चालवण्याकरतां दरबारची भाषा थोडी शिकावयाची व बाकीचे मग धार्मिक शिक्षण. राजा राममोहन राय यांचे थोडेसें अरेबिक व पर्शियन झाल्यावर त्यांना संस्कृत शिकावें लागले. 'Ram Mohan, then only 14 years old, was sent to Benaras, the great seat of sanskrit learning, with a view to learning shastras, so that his mind might be imbued with the ennobling ideas of the Hindu religion.........In a short time he ( Raja Ram Mohan ) became well versed in the Shastras and especially in Vedic lore. ' *

---

* Raja Ram Mohan Ray- by D. N. Gonguli pp. 7.

मातृभाषा व तिचें महत्व फारसें ओळखलें जात नव्हतें. ह्यामुळें सामान्य मुलांची फारच कुचंबणा होत असली पाहिजे. दयानंदस्वामी, ईश्वरचंद्र अगर राजा राममोहन राय अशा विभूतींची गोष्ट वेगळी होती. पण ह्यांनाही आपल्या आयुष्याचा अमूल्य वेळ याच शिक्षणांत दवडावा लागला. दयानंदांना सुद्धां वयाची १४ वर्षे हेच शिक्षण घ्यावे लागले. ' The next six years, were devoted to the study of grammer and Veda and before Dayananda entered his forteenth year he had learnt by heart the whole of the Yajurveda ( and ) part of the other vedas... ' *

महाराष्ट्रांतील लोकांची देखील हीच परिस्थिति होती. लोकहितवादींनीं आपल्या शतपत्रांत याचें वर्णन केले आहे. ' सांप्रतकाळीं पंडितांचें ज्ञान असें असतें कीं, त्याचा जिवास, शरिरास, प्रपंचास कांहींच उपयोग होत नाहीं. केवळ वादविवाद करण्यास व लोकांस तमाशा दाखवण्यास मात्र त्याचा उपयोग आहे. वास्तवे मला हे पंडित बहुरुपी, सोंगाडी व चित्रकथी यांतून बरे दिसत नाहींत. बारा पंधरा वर्षें पर्यंत व्याकरण किंवा न्याय यांचें अध्ययन करतात. म्हणजे त्यांस पंडितपणा प्राप्त होतो .... याचें कारण हेंच कीं, त्याप्रकरणीं वाद करण्यास शिकतात व प्रतिष्ठेकरता वाद करतात. ...... त्यांस पंडितपणा प्राप्त होतो. ...... त्यांस व्यावहारिक ज्ञान नाहीं. त्यांस मोडी देखील लिहितां येत नाहीं.[२] अशा प्रकारें उपयुक्त ज्ञान त्यास घेण्याचें साधन नव्हतें. "नारायण व्यवहार-शिक्षा"सारखें मुलाचे मोडी अक्षर घटविण्यासाठीं पुस्त्या लिहिण्याकरितां केलेले ग्रंथ अेकादेवेळेस त्रुटित रुपाने मुलाच्या दृष्टी-पुढून सरकत. अेकंदरीनें वाङ्मयाचा परिणाम जीवनावर अगदींच थोडा होत असे. इंग्रजांचा संबध आल्यापासून भाषांतरयुगास सुरवात झाली. इंग्रजींतील व संस्कृतांतील नाटकें वगैरे भाषांतरित करुन छापण्यास सुरवात झाली. तरी सुद्धां देशी भाषा [illegible] पेलदार झालेल्या नव्हत्या ' खुद्द विष्णू शास्त्री चिपळूणकरांनीं सुद्धां अ[illegible] आहे [illegible] तरी

* Swami Dayanand, By Bava Arjunsingh PP 3

२ लोकहितवादींचा शतपत्रें पत्र ८६.

आमची भाषा इतक्यांतच पुर्णतेच्या शिखरास पोचली आहे, किंवा कोणत्याही भाषेंतील कोणताही अर्थ मराठी भाषेंत चांगला हवा तसा नियमानें व्यक्त करतां येईलच असा व्यर्थ अभिमान आम्हीं तिजबद्दल वाहात नाहीं. [१] या भाषेच्या कारणानें सुद्धां आपल्याइकडे ग्रंथरचना फारशी झाली नसावी. आपल्या भाषेचा अभिमान बाळगण्याऱ्यांनीं सुद्धां तिच्यांत रचना करुं नये हें आश्चर्य आहे. ' प्राकृत काय चोरें केली ? ' असा रोख ठोक जबाब विचारणाऱ्या वंद्य पुढाऱ्यांच्या पाइकांनीं तिला दूर लोटली हे केव्हांही वाईटच झालें. असो. अर्वाचीन वाङ्मयाच्या पूर्वपीठिकेचा विचार करतांना हिंदुस्थानांतील मुद्रण कलेचा इतिहास लक्षांत घेणें अवश्य आहे. गेल्या सवाशें वर्षांच्या कालांत पद्यात्मक लेखनाची प्रथा मागें पडून गद्य रचनेच्या प्रवृत्तीला जोर चढण्याचें मुख्य कारण म्हणजे मुद्रण कलेचा प्रसार होय. एतद्देशीय भाषांत ग्रंथ छापण्याची कल्पना प्रथमतः मिशनरी लोकांनी काढली. हिंदी, बंगाली, मराठी, तामिळी, तेलगू, इ. निरनिराळ्या भाषांतून खिस्ती धर्मग्रंथांचीं भाषांतरें प्रसिद्ध करण्यासाठीं वंगदेशांतील " बॅप्टिस्ट मिशन " या खिस्ती धर्मप्रसारक मंडळीनें श्रीरामपूर येथें इ. स. १८०० त आपला स्वतःचा छापखाना काढला व प्रांतोप्रांतीचे विद्वान बोलावून त्यांच्याकडून हिंदुस्थानांतील इतर प्रत्येक भाषेंत बायबलचे भाषांतर करण्याचा उपक्रम केला. या धर्मप्रसारक मंडळीचें नेतृत्व डॉ. विल्यम केरी या महापंडिताकडे होते. त्यांनीं चाळीस भाषांत भाषांतरें प्रसिद्ध केली व श्रीरामपूर मिशनचा संकल्प सिद्धीस नेला [२] या लांबलेल्या उताऱ्यावरून असें दिसून येईल कीं, मुद्रणकलेचा उदय इंग्रजांच्या आगमनाबरोबरच झाला इतकेंच नव्हे तर येथील आधुनिक वाङ्मयाचा पाया देखील इंग्लिश मिशनरी लोकांनींच घातला ! नवीन शिक्षणाचा प्रचार झाल्यावर त्या शिक्षणाकरितां नवनवीन संहिताही ( टेक्स्ट् ) कराव्या लागल्या. त्या करण्याकरितां लोकांना बक्षिसाचें आमिश दाखवून पुस्तकें

---

[१] निबंधमाला पृष्ठ १७९.

[२] अर्वाचीन मराठी गद्याची पूर्व.—गं. बा. सरदार पृ. ३

लिहवून घ्यावीं लागलीं. "इंग्रजी भाषेच्या पुस्तकांचे जे भाषांतर करतील त्यांनीं हे लक्षांत ठेवावें कीं, या देशांतील लोकांचे चालीस अनुसरून व समजुतीस जसें नीट येईल तसें कोठें कोठें मूळग्रंथ थोडा थोडा फिरवून अर्थ संपूर्ण येईल असें केले पाहिजे.[१] असा प्रेमाचा इषाराही द्यावा लागला. अव्वल इंग्रजींतील पहिल्या पिढीला सुकाणूं नसलेल्या जहाजाचें नेतृत्व पत्करून आपली शिक्षण नौका हांकारावी लागली. दुसऱ्या पिढीला मात्र थोडें दिग्दर्शन झालें होतें. पहिल्या पिढींतील राजाराममोहन, दयानंद आदींना इंग्रजी शिकण्याला सुरवात वयाच्या दुसऱ्या अर्ध्यांतच करावी लागली व अशा रीतीनें त्यांच्या हातून झाली असती त्यापेक्षां कमी कामगिरी त्यामुळें जगापुढें आली. कांकीं ज्या भाषेच्या तोंडानें त्यांना लोकांपुढें वा राज्यकर्त्यांपुढें आपली सुधारणेचीं तत्वें अगर तक्रारी मांडावयाच्या होत्या त्या तशा आधीं मांडता आल्या नाहींत. यांच्या पुढल्या पिढीला मात्र इंग्रजीच्या द्वारें व मातृभाषेच्या द्वारें पुष्कळच ज्ञानग्रहण करतां आलें. या दृष्टीनें ते थोडे मागच्या पिढीपेक्षां भाग्यवान समजले पाहिजेत. यावेळचे सगळीकडचेच वाङ्मय असें बाल्यावस्थेंत होतें. पण त्यांच्या एकंदर पेऱ्यावरून त्यांची वाढ जोमदार होणार असें वाटूं लागले होते. त्यासंबंधीं कै. न्या. रानडे म्हणतातः—It is true the entire picture thus presented (of the literature is far from satisfactory if one looks at it absolutely. The stage of advance which the language has reached is to be hailed more for the promise it holds for the future than for any accomplished success of the fact. यावरुन असें स्पष्ट दिसतें कीं, वाङ्मयांतील नवयुगाला आतांपासून सुरवात झाली होती व त्याचे परिणाम तत्कालीन लोकांवर होत होते. या वाङ्मयाचे प्रवर्तक तेच होते. वाङ्मयाचे बाबतींतले हे युग पाहिल्यावर, व्यापारांत कोणकोणत्या घडामोडी होत होत्या, त्यापासून याविषयीं लोकांचे मत काय होतें तें पाहिलें पाहिजे. राजा राममोहनराय आदि पहिल्या पुढाऱ्यांस व्यापारी वृत्तीनें इंग्रजांनीं देश काबीज केला याची जाणीव झाली नव्हती पण या व्यापारीवृत्तीमुळें

[१] केसरी पृष्ठ १८.

अेक नवीन प्रकारचा मध्यमवर्ग आपल्याइकडे होऊं घातलेला आहे याची त्यांना जाणीव होती. ‘ अलीकडे संपत्तीची वाढ झाली आहे याचें कारण काय असावें याचा विचार करावा असें आम्हांस वाटणें अगदीं साहजिक आहे. या सुधारणेचें अंतिम कारण व्यापारावरील निर्बंध कमी झाले व युरोपियन लोक अधिक प्रमाणांत येथें येऊन राहूं लागले हे असून जमिनीची वाढती किंमत हें या परिस्थितीचें अधिक नजीकचे कारण आहे.[१] ’ इंग्रजांच्या आगमनामुळें आमचा व्यापार वाढेल व त्यायोगें आम्हीं संपन्न होऊं असा भरंवसा आमच्या इकडील पुढाऱ्यांस वाटूं लागला याचा अर्थ खरा व्यापारी कावा त्यांस उमगला नाहीं, हेंच खरें. राममोहनसारख्या व्यापाऱ्यांतील अनभिज्ञाला त्याबद्दल खरें कारण निवडून न काढतां आले, तर त्यांत फार आश्चर्य नाहीं पण ‘ गुप्त ’ अमरशेट सारखे व्यापारी कीं, ज्यांनी इंग्रजांना राज्य स्थापण्यास आर्थिक मदत केली होती, त्यांना सुद्धां त्यांच्या व्यापारावर इंग्रजांच्या आगमनानें विरजण पडेल असें वाटलें नाहीं.[२] तसें जर त्यांना वाटतें तर त्यांनीं इंग्रजांना मदत केली नसती. व्यापाराला हवी असणारी देशांतील शांतता त्या वेळच्या व्यापाऱ्यांना पाहिजे होती, म्हणून त्यांनीं इंग्रजांकरवीं ती शांतता प्रस्थापित करण्याचा विचार केला. त्यांना जितके मुसलमान नकोत तितकेच मराठेही नको होते ‘ अशा स्थितींत बंगालमधील व्यापाऱ्यांनी आपल्यावरील मुसलमान नबाबाविरुद्ध किंवा राज्यकर्त्याविरुद्ध बंड करण्यास ब्रिटीश व्यापाऱ्यांना साह्य केलें असते व या मध्यम वर्गाला कांहीं काळ ब्रिटीशांच्या शांततेचा अंमल जुलमी व परधर्मीय जमीनदाराच्या जाचांतून आपली मुक्तता करण्यासाटीं परमेश्वरांनींच स्थापन केली आहे, असें वाटले असतें तर त्यांत नवल नाहीं. ’[३] व्यापाऱ्यांनाच नव्हे तर, राजा राममोहनराय प्रभृती सुशिक्षित बंगाली हिंदू, जमीनदार लोकांच्या जुलुमांतून मुक्त करण्यासाठींच परमेश्वरानें ब्रिटिशांना हिंदुस्थानांत धाडलें असे म्हणत होते. ’[४] हें झालें

---

[१] आधुनिक भारतः—श्री. शं. द. जावडेकर पृ. १८.

[२] आधुनिक भारतावरून. [३] व [४] कित्ता पृष्ठ १४.

आपलेकडील लोकांचें मत. जेते लोकांचें देखील असेंच मत होतें असें दिसतें, कारण सर जॉन मालकम् यानें म्हटलें आहे कीं, ' आमच्या राज्याची वाढ ही ( त्यावेळेला ) व्यापारी वर्गाला आणि कांहीं अत्यंत दरिद्री व अशिक्षित लोकांना अनुकूल झाली आहे. '[१] लोकांच्या समजुतीप्रमाणें मात्र आमच्या इकडला व्यापार वाढण्याच्या ऐवजीं बसत चालला त्याचें निदान त्यावेळच्या कोणालाही झाले नाहीं. कांहीं काल व्यापाऱ्यांना इंग्रजांचा हा अंमल शांततेचा वाटला पण परिणामीं तो अहितकारक ठरला. आपला व्यापार कसा वाढवावा याविषयीं आपल्या इकडील लोकांनीं विचार केला नव्हता असें नव्हे. लोकहितवादी यांनी हिंदु लोकांनीं उद्योग करण्याची आवश्यकता या त्यांच्या पत्रांत चर्चा केली आहे. हे म्हणतात, ' इंग्रजांप्रमाणें शहाणें व्हावें आणि जो व्यापार ते करतात तो आपण करावा. कोणी म्हणतील कीं, त्यांस ( इंग्रजांस ) द्रव्य अनुकूल आहे आणि या लोकांत द्रव्याची अनकुलता नाहीं. ( पण ) जेव्हां सर्व लोक पुढें सरावें अशी इच्छा करतील व रानटीपणाच्या समजुती सोडून देतील तेव्हां अनुकूलता सहज प्राप्त होईल. '[२] लोकहितवादींच्या व्यापाराच्या व उद्योगधंद्याच्या कल्पना कशा होत्या, त्या पहा.

" आपले लोकांनी रोजगार कोणते करावे म्हणाल तर कांच, कापड, सुरी, कात्री, लाकडी सामान, घड्याळें, चाकू, यंत्रे इत्यादि पुष्कळ पदार्थ इंग्रज इकडे खपवितात हीं सर्व आपले लोकांनीं करावयास शिकावें व येथें जो माल खपणार नाहीं तो दुसऱ्या देशास घेऊन जावा आणि तेथे विकावा. पुष्कळ देश आहेत. या गोष्टींचा शोध करावा. व इंग्रजाचे देशाचे सामान बंद करावें किंबहुना आपले सामान त्यांस द्यावे परंतु त्यांचे आपण घेऊं नये. जो इकडे उत्पन्न होईल तितका माल घ्यावा विलायती कापड घेऊं नये. यास्तव आपल्यास जाडिभरडें कापडे नेसावयास लागलीं तर काय चिंता आहे. परंतु आपल्या देशाचे रक्षण करावे असें झालें म्हणजे बहुत रोजगार

[१] किता पृष्ठ १५.

[२] लोकहितवादी शतपत्रें पत्र ४४ वें.

राहातील. परंतु हे या लोकांस सुचत नाहीं." [1] ही विचारसरणी कितपत तर्कशुद्ध आहे याचा वाचकानेंच विचार करावा. "पांढरपेशा मंडळींनी आपले व्यवसाय सोडून घिसाड कामाकडे मोर्चा फिरविला म्हणजे देशांतील दारिद्य एकदम नाहींसे होईल ही कल्पना व्यर्थ आहे असें वाटते." [2] हिंदुस्थानांतील व्यापार अव्वल इंग्रजींतून लोकांच्या कल्पनेप्रमाणें वाढण्याच्या ऐवजीं बसत चालला आहे यावरून आपलें व्यापाऱ्याचें अवनतीचें युग सुरू झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

इंग्रजांशीं संबंध आल्यापासून दर्यावर्दीपणाचें धाडस आपल्या इकडील लोकांच्या अंगांत आलें म्हणावें तर तेंही फार प्रत्ययास येत नाहीं. राजा राम-मोहनराय, स्वामी विवेकानंद, दादाभाई नौरोजी या सारख्या लोकानीं परदेशगमन करून प्राय:श्चित्ताचे लोढणें सोडूनही हिंदी लोकांना जो धडा घालून दिला तो फारसा कोणी अमलांत आणला आहे असें दिसत नाहीं. डॉ. आनंदीबाई जोशी या महिलेचे व तिच्याबरोबर तिचे पती गोपाळराव जोशी यांचे मात्र त्यांनीं त्यावेळीं दाखविलेल्या एकट्यानीच परदेशास जाण्याच्या धाडसाबद्दल कौतुक केल्याशिवाय राहवत नाहीं! [3]

---

[1] लोकहितवादी ग. द. केळकर पृष्ठ ८३–८४

[2] कित्ता पृष्ठ .५   [3] डॉ. आनंदीबाई जोशी यांचे चरित्रावरून.

# प्रकरण ३ रें

## " कोणतें घ्यावें व कोणतें घेऊं नये " याविषयीं धरसोडीची वृत्ति : बाहेरून कारणें न शोधतां आल्यानें आपल्यांतील चूक शोधून काढण्याची वृत्ति : त्यामुळें धार्मिक रूढींवर प्रथम प्रहार !

अव्वल इंग्रजीच्या काळाचे हिंदुस्थानचे दोन तरी भाग पडतात. बंगाल मद्रास या प्रांतांत इंग्रजांचा प्रवेश आधीं झाल्यानें त्या प्रांतावर त्यांच्या राज्य-पद्धती, भाषा, संस्कृती, धर्म आदि बाबतींत लवकर ठसे उमटत गेले. मागच्या प्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणें इंग्रजांनी जें जिंकलें तें इथल्याच लोकांच्या मदतीनें, आणि तेंही व्यापारी लोकांच्या पैशाच्या जोरावर ! व्यापारी लोकांनीं स्वतःच्या फायद्याकरितां आपला व्यापार सुरळीत चालावा म्हणून हें जोखड अंगावर घेतलें खरें पण त्याशीं जुळतें घेण्याचें व त्यापासून उद्‌भवणाऱ्या संस्कृतीसंघर्षणाशीं तोंड देण्याचें काम मात्र देशांतील पुढारी म्हणविणाऱ्या लोकांच्या अंगावर पडलें ! पहिल्या सुशिक्षित पिढीला आपल्या समाजांतील अधःपाताची ठिकाणें जागजागीं दिसूं लागलीं. समाजपुरुषाला लागलेली ही जळवें कोणत्या कारणानें आलीं याची चिकित्सा मात्र त्यांना नीटशी करतां आली नाहीं. रोग कळला, पण रोगाचें मूळ कारण कळलें नाहीं म्हणजे औषध देणाऱ्या वैद्याची जी तारांबळ उडते तीच स्थिति या पहिल्या समाज-सुधारकांची झाली. परतंत्रता आल्यानें आपल्या समाजांतील घडी विसकटून जात आहे हेंही त्यांच्या लक्षांत येईना. " त्यांना वाटे इंग्रज यावयाच्यापूर्वी काय आपण स्वतंत्र होतों ! " मुसलमान नबाब नव्हते कां आपल्यावर राज्यें करीत ? मुसलमान गेले—मराठे येणार होते, त्याऐवजीं इंग्रज आले, त्यांत मोठासा काय फरक झाला ? पण मुसलमानांची सत्ता " आपली " होती, ही इंग्रजी सत्ता " परकी " आहे हें त्यांना त्यावेळीं समजलें नाहीं. आपल्या नशिबाची दोरी परक्यांच्या ६ हजार मैल दूर असलेल्या सर्वस्वी अपरिचित

अशा राष्ट्राच्या हातांत गेली हेंच यांना उमगेना. एखादा मक्तेदार मक्ता नव्या दरानें घेतो तसें राज्य इंग्रजांनीं घेतलें ते लगेच सोडतील अशी त्यांची वृथा समजूत होती. "हिंदुस्थानचे लोक शहाणे झाले म्हणजे ( इंग्रजांना ) हळूंच म्हणतील कीं, तुमच्या देशांत पार्लमेंट आहे तसें द्या...मग अर्थातच इंग्रज फक्त व्यापार करुन राहतील...ज्याकाळीं इंग्रज गडबड करूं लागतील किंवा कांहीं नवीन कानू बसवावयाचा आग्रह धरतील त्यावेळीं अमेरिकेंत झालें तसें होऊन हे लोक आपल्यास स्वतंत्र करुन घेतील आणि इंग्रजांस सांगतील कीं, "तुम्ही आपलें देशीं जावे"[१] याप्रमाणें लोकहितवादींची कल्पना होती.

असें होण्यास २०० वर्षें लागतील असें लोकहितवादी म्हणतात तें मोघमाचें बोलणें होय. यावरून इतकें अनुमान बांधतां येईल कीं, आपल्या इकडील लोकांस इंग्रजी राज्याची पाळेमुळें कोठपर्यंत खोल गेलीं आहेत त्याची कल्पना नव्हती; व कल्पना नव्हती म्हणूनच ते आपल्या समाजाच्या अधोगतीची कारणें देशाच्या पारतंत्र्यांत न बघतां स्वतःच्या समाजांतच शोधूं लागले. आपला धर्म, आपला समाज, आपली संस्कृती, आपलें वाङ्मय-सर्व कांहीं आपलें ढिसूळ झालें आहे. त्याची अंतर्बाह्य सुधारणा झाली पाहिजे. ती सुधारणा झाल्याविना जर आम्हांला राजकीय हक्क मिळाले तर पुन्हां देशांत बजबजपुरी माजेल असें त्यावेळच्या लोकांचें स्पष्ट मत होतें! पुनः पेशवाई अगर नबाबशाही येईल याची त्यांना भीति वाटत होती! "इंग्रजांनीं ज्यांची इनामें जप्त केलीं व त्या योगें जे लोक निराधार झाले व भिकेला लागले त्यांना स्वतःच्या पूर्वीच्या उच्चपणाची जाणीव असल्यानें ते इंग्रजानीं दिलेल्या नोकरीच्या आमीषाला भुलत नसत. स्वतः व्यापार करून त्यांच्या पैकीं कित्येकांनीं आपली भरभराट करून घेतली असें जरी असलें तरी ह्या लोकाना आतां इंग्रजी राज्याबद्दल द्वेष न वाटतां उत्तरोत्तर आनंद वाटत आहे." अशी साक्ष राजा राममोहनराय यांनीं इंग्लंडला गेले असतांना कमिटीच्या पुढें दिली. आमच्या इकडील सुशिक्षितांना राजकीय परतंत्रतेचे

---

[१] लोकहितवादी शतपत्रें नं. २५—( आजकालचा महाराष्ट्र वरून पृ. ८९ )

गूढ न उकलण्याचे कारण आता चर्चिल्याप्रमाणे त्यांना उमगलें नसेल त्याला आणखी एक कारण संभवतें तें म्हणजे वाढलेली शारीरिक आणि मानसिक दुर्बळता. शरीरानें शक्तीचे गुलाम तर मनानें सुखाचे गुलाम अशी वृत्ति त्यावेळीं होती, (त्या वेळेपेक्षा आतां जास्त फरक झालेला आहे असें वाटत नाहीं. फक्त फरक झालाच असेल तर महात्मा गांधींच्या अनासक्ती-योगानें मनानें सुखापासून अलिप्त राहण्याचे धोरण बाळगणारे काहीं पुढारी दिसत आहेत.) त्यामुळें बलिष्ट इंग्रजांशीं झुंजून सामना देता तर येत नाहीं मग कर्तृत्वाची दुसरी निवाऱ्याची जागा शोधून काढण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. यामुळेंही आपल्या "घराची सुधारणा" आधीं करावी असाही त्याचा ग्रह होणें शक्य आहे. बाहेरून कोठेंही कारण सापडलें नाहीं कीं अंतर्मुख होऊन त्याची हालचाल बाह्यतः बंद झाल्यासारखी दिसते. बाह्यतः दिसते खरी व इतक्या दिवसांच्या निश्चेष्टतेनें त्याच्यावर पुष्कळ ग्लानी आली आहे हेंही खरें. तरी एकंदरीत पाहता आंतल्या शरीर प्रकृतीस काहीं धक्का पोचला आहे असें आम्हांस वाटत नाहीं."—

रा. ब. रानडे हे जितके समाज सुधारक होते तितकेच ते राजकीय हक्काबद्दल जागरुक असत. पण त्यांच्यावर ते हयात असतांना किती टीका-प्रहार झाले हे त्यांचें चरित्र वाचल्यावर कळून येईल. प्रिन्सिपॉल आगरकर एवढे समाज सुधारणावादी कीं, ज्यांना त्या परिस्थितींत "हिंदुस्थानचें हें जरठ झाड" केव्हां मोडून पडेल त्याचा नियम नाहीं असें वाटत होते. ते सुद्धां सामाजिक आधीं कां राजकीय हा प्रश्न पुढें आल्यावर म्हणतात "विशिष्ट प्रकारच्या राजकीय व्यवस्था समाजाच्या अस्तित्वाला अत्यावश्यक आहेत. म्हणजे त्या नसल्या तर समाजाची वाताहात होते. सामाजिक सुधारणेची गोष्ट तशी नाहीं. त्या समाजांस शोभा देतात किंवा विशेष प्रकारचा आनंद उत्पन्न करतात. तेव्हां त्या मागून झाल्या तरी चालतील. हें आगरकरांचें मत असलें तरी लोकमान्य टिळकांनीं जेव्हां राजकीय लिखाणाचा प्रश्न धसास लावला तेव्हां आगरकरांना "केसरी" सोडून द्यावा

लागला व स्वतःचा सुधारक काढावा लागला. लोकपक्षांच्या राष्ट्रीय सभेंत देखील "ह्या सामाजिक-राजकीय" वादावर दरवर्षी रणधुमाळी माजावयाची पण या वादाचा शेवट सामाजिक--परिषद राष्ट्र--सभेपासून दूर करण्यांत झाला व त्यापुढें सामाजिक सुधारणा या वेगळ्या स्वरूपांत मोडूं लागल्या व त्यांना हिंदुस्थानच्या इतिहासांत दुय्यम प्रकारचें स्थान मिळूं लागलें. त्या बरोबर त्या सुधारणा करणारे पुढारीही लोकांच्या दृष्टीनें कमी प्रतीचे भासूं लागले. ही गोष्ट फार पुढें झाली. आपणांस ज्या काळाचा इतिहास पाहावयाचा आहे, त्या काळाच्या पहिल्या स्तबकांत सामाजिक--राजकीय यांत मतभेद होता. दुसऱ्या स्तबकांत दोघांची फारकत होण्यास सुरवात झाली. तिसऱ्या स्तबकांत तर राजकीय श्रेष्ठ व सामाजिक कनिष्ठ असें रूप आलें. सामाजिकांत धार्मिक व व्यक्तिविषयक उन्नत्तीच्या उपायांची चर्चा झाली. वाद माजले. खडाजंगी झाली. त्या धार्मिक चळवळीचें स्वरूप कसें होतें, तिला कोणी कोणी कसा हातभार लावला, ती पुढारली कशी इत्यादि गोष्टींचें विवेचन पुढल्या प्रकरणांत यावयाचें आहे.

धार्मिक गोष्टींस प्रमुखपणा यावयाचें कारण म्हणजे इंग्रजी सत्तेबरोबर खिस्ती धर्मप्रचारक आपलेकडे आले. त्यांना हिंदुस्थानचें हें उघडें कुरण फार चांगलें वाटलें. खिस्ती धर्मप्रचारकाला असें वाटलें असतें तर त्यांत कांहीं आश्चर्य नव्हतें पण इकडे आलेल्या ब्रिटिश मुत्सद्यांनाही तसेंच वाटूं लागलें होतें. "ब्रिटिश मुत्सद्यांपैकी ज्यांना हिंदी संस्कृतीविषयीं आदर किंवा ज्ञान नव्हतें त्याना ज्या प्रमाणें हिंदी लोकांनीं खिस्ती व्हावे असें वाटत होतें, त्याचप्रमाणें ज्या ब्रिटिश मुत्सद्यानीं अगर पंडितांनीं भारतीय संस्कृतीचें अध्ययनपूर्वक ज्ञान करून घेतलें होतें व ज्यांना हिंदी संस्कृतीबद्दल आदर असून हिंदी लोकाची सुधारणा व्हावी व अखेरीस त्यानीं स्वतंत्र व्हावें असें वाटत होतें, त्यानाही हिंदू लोक आज ना उद्यां खिस्ती धर्माची दीक्षा घेतील असें वाटत होतें!"[1] या बरोबर ही एक मौजेची म्हणून लक्षांत

[1] आधुनिक भारत पृ. ६३

ठेवण्यासारखी गोष्ट आहे कीं, "या पाद्र्यांना हिंदू लोक ख्रिश्चन होतील असें वाटत होतें. पण हिंदुस्थानांत राहाणारे मुसलमान मात्र बाटावयाचे नाहींत असें वाटे. याचें कारण त्यांनीं असें दिलें आहे कीं, " . त्यांना दीक्षा देण्याचें काम इतरांना ती दीक्षा देण्यापेक्षां अधिक कठीण जाईल. ... या बाबतींत मुसलमानांच्या भावना मात्र मोठ्या विलक्षण आहेत. मूर्तिपूजक म्हणून ते हिंदूंना तुच्छ लेखतात पण ते ख्रिस्त्यांचाही तितकाच तिटकारा करतात. कां तर आमची येशूवर श्रद्धा आहे म्हणून नव्हे तर त्यांचा धर्म-पुरुष जो महंमद त्याची आम्ही भक्ती करीत नाहीं म्हणून![1] या ख्रिस्ति-धर्म प्रचारकांना चोख उत्तर देऊन त्यांचें तोंड बंद करावयाचें काम आमच्या इकडील अव्वल समाज सुधारकांना करावें लागलें. याच्या अनुषंगानें समाज-सुधारकांनीं आणखीही कित्येक धार्मिक बाबतींचा समाचार घेतला. कित्येक रुढींचा नाश केला. नव्या गोष्टी प्रचारांत आणल्या. याचें विवेचन पुढील प्रकरणीं करूं.

---

[1] कित्ता पृ. ६६

# प्रकरण ४ थें

## धार्मिक गोष्टींशीं सरकारचा संबंध नसल्यानें शक्ति वेंचण्याचें तें एक उघडें स्थान लोकांना मिळालें !

इंग्रजांचें राज्य येथें स्थापन होणार हें ठरल्यापासूनच येथील लोकांच्या धार्मिक कल्पनांशीं कोणत्याहि तऱ्हेचा आपला संबंध येऊं द्यावयाचा नाहीं असा जणूं काय इंग्रजानीं बेतच केला होता. मागच्या प्रकरणांत येथील व्यापाऱ्यांनी इंग्रजाचे राज्य बळकट करण्यासाठीं त्यांना मदत केली असा उल्लेख केला आहे. ह्या व्यापाऱ्यांनीं ब्रिटिशाकडून कांहीं अभिवचनें घेतलीं त्यांत...ब्रिटिशांनीं प्रत्येक वेळीं आम्ही तुमच्या धर्मात हात घालणार नाहीं, आणि तुमचीं देवळें रक्षण करूं असें आश्वासन दिले आहे. ... व्यापारी व सावकार या श्रेष्टींनीं बऱ्याच मोठ्या प्रदेशावर शांततेचे राज्य असावे आणि धर्ममंदिरांचा विध्वंस होऊं नये..." [१] असेंच त्यांना वाटे. या सर्व गोष्टींवरून व येथील लोकाची धर्मासंबंधीं कल्पना पाहून ब्रिटिशानीं ठरवलें कीं, जोपर्यंत आपण या देशांवर व्यापार व राज्य करीत आहोंत तोंपर्यंत यांच्या धर्मात ढवळाढवळ करावयाची नाहीं. याचे कारण त्यांना हिंदी लोक ख्रिस्ती झाले तर नको होते असे नाहीं. उलट सर्व हिंदू लोक लवकरच आपल्या ज्ञानग्रहणानें ख्रिस्ती होतील अशी प्रबळ आशा त्याना वाटे. पाद्री लोक तर काय धर्मप्रसाराकरितां अगदीं हापापलेच होते. नवीन शिक्षण संस्था चालविण्यास आमच्याच ताब्यांत द्या म्हणजे हळूं हळूं ज्ञानप्रसार व धर्मप्रसार करणें सुलभ जाईल असें त्यांना वाटे. पण तत्कालीन सरकार याला भीत असे. त्यांचे..."मुख्यही धर्मप्रसाराच्या बाबतींत पाद्री लोक ज्या साधनांचा अवलंब करीत होते त्या साधनाचा परिणामाच्या दृष्टीनें निषेध

---

[१] आधुनिक भारत पृष्ठ २४.

करीत आणि सरकारमार्फत होणाऱ्या लोकशिक्षणाच्या प्रयत्नांत धर्मप्रसाराचा प्रत्यक्ष संबंध आणूं नये असें निक्षून सांगत. ” [१]

अशा रीतीनें आक्रमक शक्तीचे सरकारच धर्मांत हात घालीना तेव्हां ख्रिस्ती धर्म व हिंदु धर्म यांचीं उघड्या डोळ्यांनीं तुलना इकडील जाणते करूं लागले. जातां जातां हें सांगितलें पाहिजे कीं, पोर्तुगीजानीं धर्माच्या बाबतींत गांवेंच्या गांवें बाटवून प्रसार केला. पण शेवटीं तो त्यांना घातक ठरला व शेवटीं सरकारी रीत्या तो बंद करावा लागला. तेव्हां असें आत्मघातकी धोरण ब्रिटिशांनीं स्विकारलें नाहीं. यांत त्यांचा शहाणपणा दिसून येतो. आणि एवढीही सावधगिरी जरी ब्रिटिशानीं दाखविली तरी पुढें १८५७ सालच्या शिपायांच्या अस्वस्थतेचा वणवा हीं धार्मिक बंधनें मोडण्यांत आलीं, या नुसत्या नांवाखालीं कां होईना जो पेटला तो पेटलाच. बंगालमध्यें जेव्हां प्रथमतः ब्रिटिशांचा संबंध आला तेव्हां ब्रिटिशांना राजसत्ता हातीं येईल असें वाटलें नव्हतें. तेव्हां या नसलेल्या सत्तेचा फायदा घेऊन कांही पाद्री आधींपासूनच धर्मप्रसाराचें काम चालवत होते. तें ब्रिटीश राज्य तेथें स्थिरावलें तरी चालूच होतें. त्या त्यांच्या करण्याकडे त्या वेळचे ब्रिटीश सत्ताधारी, जरी धार्मिक ढवळाढवळीपासून अलिप्त राहण्याचें धोरण ठरलें होतें तरी, कानाडोळा करीत. मग काय पाद्यानीं अगदीं धुमाकूळच माडला. त्यावेळीं राजा राममोहन राय हे हिंदुधर्मातील कलंक शोधून काढून तो धुवून टाकण्याच्या विचारांत होते. त्यांनी सडेतोडपणें ब्रिटिश सरकारास हें जाणवून दिलें कीं, “ धर्मासंबंधीं तटस्थता राखूं हें जें ब्रिटिशांचें जाहीर धोरण त्याच्याशीं जें त्यांच्या धर्माचा उघड प्रचार करूं देणें, अभिजित लोकांच्या धर्माची उघड निंदा करण्यास परवानगी देणें हें विरुद्ध आहे. दुसरें असें कीं, हिंदु व मुसलमान धर्मांचीं बिंगें चवाठ्यावर मांडण्याच्या उद्देशानेंच व्याख्यानें देणें व पत्रकें वाटणें हें चुकीचें आहे. तिसरें असें कीं, ऐहिक अभ्युदयाचा लोभ दाखवून धर्मांतर करविणें अश्लाघ्य आहे. सरकारचे बंगाली प्रजानन दरिद्री

---

१ कित्ता पृ. ६४

व दुर्बल आहेत. इंग्रजांचें नांव ऐकिलें कीं, ते भयभीत होतात. अशा लोकांवर राज्यसत्तेच्या जोरावर सक्ती करणें हें महाभयंकर व निंद्य आहे "[१] जितक्या कडक रितीनें राजा राममोहनराय यांनी ब्रिटिशांना धर्मांत हात घालूं नका म्हणून दरडावले तितक्याच हिरीरीनें त्यांनी आत्मनिरीक्षण करण्यास सुरवात केली. आपल्या धर्मातील रूढींनीं लोकांचे होणारें दुःख त्यांना ढळढळींत दिसूं लागलें. व तें कसे कमी करावे याकडे त्यांची वृत्ति लागली. त्यांनीं कोणकोणत्या गोष्टी केल्या व कां केल्या याची आपण आतां मीमांसा करूं. (राजा राममोहनानीं काढलेल्या ब्राह्मसमाजाची मीमांसा यथावकाश देण्यांत येणारच आहे) इसवी सन १८०० च्या सुमारासच सरकारलाच वाटूं लागलें होतें कीं, सतीचीही दुष्ट चाल बंद करावी.* पण सरकार धार्मिक कार्यांत हात घालण्यास घाबरत होते. ज्याप्रमाणे बंगालमध्ये सरकारने धार्मिक कार्यासंबंधीं धोरण ठेवले होते तसेच महाराष्ट्रातही त्याचे तच धोरण होते. "सन १८२४ सालीं अहमदनगरहून दोन मनुष्यें मिशनच्या संबंधानें पुस्तकें विकण्याकरितां पुण्यास आलीं. त्यांस सरकारनें बंदी करून अटकेंत ठेवलें. याप्रमाणें पूर्वीचे इंग्रज सरकार या देशातील लोकांच्या धर्मासंबंधीं स्वतंत्रतेविषयीं भित्रेपणानें वागत होतें "[२] पण राजा राममोहनरायांसारखे हिंदी सुधारकच जेव्हां आपल्यांतील दोषासंबंधीं उघड उघड चर्चा करूं लागले तसतसें इंग्रज सरकारासही अवसान चढूं लागले. लॉर्ड वुइल्यम बेंटिंग यांनीं राजा राममोहनांना स्वतः बोलावणें पाठवून त्यासंबंधीं चर्चा केली होती.[3] राजा राममोहनासारख्या समाजसुधारकाना इंग्रजी सत्तेचा यावेळीं फार उपयोग झाला. ही सतीची चाल बंद करण्यापाठीमागें त्याचे दोन हेतू होते. एकतर धर्माच्या रूढ कल्पनांखालीं चाललेली समाजाची गळचेपी त्यांना कमी करावयाची होती. हिंदुसमाजाला धक्के देऊन जागा करावयाचा व अशा रीतीनें नवीन सुधारणांना

[१] आधुनिक भारत पृष्ठ ६७.

* Raja Ram Mohan Roy. D N. Ganguli pp. 29.

[२] पुणें शहराचें वर्णन पृ. ११६ [3] Raja Ram Mohan Roy pp 29

मार्ग मोकळा करून द्यावयाचा. या हेतूशिवाय स्त्री सुधारणेच्या व्यापक तत्वांचाही त्यांना प्रसार करावयाचा होता. समाजाच्या नावाखालीं पुष्कळ निरपराध व्यक्तींची सरसहा कत्तल होत होती ती त्याना थांबवावयाची होती. धार्मिक बंधनें व रूढी या खिळखिळ्या करावयाच्या म्हटल्या म्हणजे त्याला कुठून तरी तोंड हें पाडावेंच लागतें. ते हें तोंड सतीच्या रूपानें फुटलें. सती हें स्त्री दास्याच्या अनेक प्रतिकापैकीं एक प्रतीक आहे धार्मिक स्वातंत्र्य आणि बौद्धिक स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्यासाठीं ब्रम्हसमाज व पाश्चात्य-शिक्षण याचा पुरस्कार करणाऱ्या राममोहनांनीं स्त्री स्वातंत्र्याच्या व्यापक प्रश्नाला प्रथम चालना दिली.[१] या सतीच्या बंदींतूनच राजा राममोहनाच्या धार्मिक बंधनाविरुद्ध बंडाला प्रारंभ झाला. हें बंड सुरू करण्यास तात्कालिक कारणेंही पुष्कळ झालीं. तीं कोणतीं घडलीं हें सांगण्यापूर्वी ब्रिटिश लोकांचीं खरीखुरी मदत या कामीं झाली हे स्पष्ट कबूल करावयास हवें. लॉर्ड विल्यम बेंटिंग यांनी या संबंधीं सागितले आहे कीं, " माझ्या अंतःकरणांतील पहिला व मूलभूतहेतू हिंदूंचे कल्याण व्हावे असाच आहे. त्यांची पद्धत कशीही असली तरी त्यांच्यात अधिक शुद्ध नीतिमत्ता स्थापन व्हावी आणि परमेश्वरी इच्छेसंबंधीं त्यांचे विचार अधिक न्याय्य व्हावेत याच्या इतकें त्यांच्या भावी सुधारणेचे दृष्टीनें दुसऱ्या कशाचेहीं महत्त्व नाही असें मला वाटतें. हें ज्ञान त्यांना होण्याच्या दृष्टीने पहिली पायरी म्हणजे खून आणि रक्तपात यांच्यापासून त्यांचे धार्मिक आचारविचार अलिप्त होतील अशी व्यवस्था करणे हीच होय. अशा पाशवी उन्मादापासून हे मुक्त होतील तेव्हांच ते सर्वमान्य सत्यतत्वाचें अधिक शांतपणे आकलन करूं शकतील, तेव्हां त्यांच्या लक्षांत येईल कीं परमेश्वरी कायद्यांत विसगती असू शकत नाहीं. कोणाही अनपराध्याचें रक्त सांडू नये या परमेश्वरी आज्ञेला अपवाद असू शकत नाहीं. आपल्या अत्याचारी रुढीपैकीं अग्रगण्य रुढीचा हा प्रसाद त्यांच्या लक्षांत आल्यानंतर आपल्या उन्नतीच्या आड येणाऱ्या वरील दास्यांची

[१] आधुनिक भारत पृ. ८३

बंधनें व बेड्या त्यांनीं तोडल्या म्हणजे येईल. त्या परक्या सत्तेचे गुलाम होऊन राहण्याची त्यांची सध्यांची वृत्ति ते सोडून येतील व मानव कुलांतील आपलें न्यायस्थान ते पटकावतील अशी ही आशा आपण करूं शकत नाहीं काय?" [1]

या लांबलेल्या उताऱ्यावरून ब्रिटिशाची तेव्हाची शुद्धवृत्ति दिसून येते. बेंटिंकसाहेबांच्या अहवालांतील पुष्कळ विचारांवर राजा राममोहनांची व त्यांच्या विचाराची छाया पडल्यासारखी दिसते. कारण सतीची चाल कायम कायद्यानें बंद करण्याचें आधीं त्यानीं राममोहनांनाच विचारलें होतें. त्यावेळीं सरकारनें एकदम ही चाल कायद्यानेच बंद करावी असें त्यांनी ठासून सांगितलें होते. एकदम बंद करण्यानें लोक दंगा करतील ही भीती व्यर्थ आहे. कारण बंगाली लोक भेकड व दुर्बळ आहेत असेंही त्यांनी सांगितलें होतें. असें म्हणतात! कोणत्याही कारणानें कां होईना त्यानीं या कार्यास आरंभ केला हें मात्र खरें. त्यांच्या डोळ्यादेखत होणारा हा अन्याय ते सहन करावयास तयार नव्हते. एकदां त्यांनीं एक सती स्त्री आगीचा आंच सहन न झाल्यानें चितेवरून उडी मारतांना पाहिली तेव्हां ब्राह्मणांनीं तिला तशीच ठासून आगींत टाकलें व मारलें! अशीं उदाहरणें तर प्रत्यहीं घडत. पण धर्मांशिवाय देखील या सतीच्या मागें अंधाऱ्या गोष्टी असत. कित्येक वेळां एकट्या वारस असलेल्या स्त्रीच्यामागे तिच्या नवऱ्याची इस्टेट बुडविण्याचा डाव असे व असें व्हावें म्हणून ते त्या स्त्रीस सती जाण्याचा आग्रह करीत. कधीं भटांकडून त्यांची समजावणी करण्यांत येत असे तर कधीं अशा असहाय्य स्त्रियांना भांग पाजून त्यांच्या त्या अवस्थेंत सती जाण्याचें कबूल करुन घेत व अशा रितीनें सक्तीच्या स्वखुषीनें ठरवून लोक पार पाडीत! सतीचा कायदा सरकारनें करून १८२८ त ती चाल बंद केली. तेव्हां बंगाल्यांत एक धर्म–सभा नांवाची संस्था होती. त्या

---

[1] किता पृ. ८५ (Development of Indian Policy by Anderson & Subedar.)

संस्थेनें सती ही धर्माची बाब आहे असें प्रतिपादण्याचा मोठा अट्टाहास करून पाहिला पण ह्याला धाब्यावर बसवण्यांत आले.

महाराष्ट्रांतही या सतीच्या चालीचे अमानुष प्रकार घडले होते. "सुभानुनाम संवत्सरीं भाद्रपद वद्य अष्टमीस ( इ. स. १८२३ ) एक कोंकणस्थ ब्राह्मणाची स्त्री राधाबाई ही सती निघाली. तिला ओंकारेश्वराजवळ सरणावर चढवली व अग्नि दिला पण तिला तो सहन न होतां तिने सरणांतून बाहेर उडी टाकली तेव्हा तिचे अंग भाजलें होतें; प्राण होता म्हणून इंग्रज सरकारच्या कामगारांनीं तिला शहरात आणून औषधी उपाय केले.... गावांत सती आगली...दुष्ट चिन्ह झाले...असे लोक बोलूं लागले." [1]

दुसरेंही असें उदाहरण झालें की, 'एक स्त्री सती जात असतां तिचेही अंग पोळून ती बाहेर निघाली सर्व अंगाची आग झाली म्हणून ती नदींत उडी टाकण्यास नदीकडे जाऊ लागली पण ब्राह्मण लोकांनीं जुलमानें तिला ओढून सरणांत फेंकली व वर मोठमोठे ओंडे टाकून तिचा प्राण घेतला!' [2] ही गोष्ट पुण्याची झाली. त्यावेळीं सरकारचा सतीबंदीचा कायदा नसल्याने सरकाराला त्या दुष्ट ब्राह्मणांना शिक्षा करता आली नाहीं. तरी पण त्यांनीं त्याही वेळीं त्या सर्व लोकांस ताकीद दिली कीं, ज्या बाईला सती जाणें असेल तिने अथवा तिच्या घरच्या मंडळींनीं सरकारांत कळवावें. सरकार हुकूम देईल तर जावें. सती जाण्यास माडव घालणें तो बदायाकडून चांगला बळकट घालावा. त्याजवर मोठमोठाले ओंडे टांगू नयेत. गळ्यांत कापूर हातांत राळ वगैरे कांहीं एक घेऊं नये.... जवळ सरकारचा पाहरा असे. जर सती बाहेर निघाली तर पुन्हां तिला आंत टाकूं नये असा बंदोबस्त सरकारनें ठेविला होता. "पण पुढे जेव्हां १८२८ त कायद्याने सती जाणें बंद केलें तेव्हां पुण्यांतील लोकांसही, त्यांतून ब्राह्मण लोकांस, अतिशय दुःख झालें. त्यांस वाटलें कीं, आतां धर्म बुडाला—रस्त्यांतून विधवेचा अप-

---

[1] पुणें शहराचें वर्णन पृ. ११४. [2] कित्ता पृ. ११५.

शकून होईल." [१] मात्र बंगाल्याप्रमाणे सतीचा कायदा रद्द करण्यासाठीं एकादी संस्था आपल्या इकडे निघाली नाहीं.

धार्मिक कल्पना व रुढींविरुद्ध बंड करण्यास जी हिंदी समाज सुधारकांनी सुरवात केली तिला प्रथम सरकारनेंच पाठिंबा दिला. यावरून समाज सुधारकांच्या कार्यास गौणत्व येतें असें कित्येकांचें म्हणणें आहे. पण त्याला नाकारून निर्वाह नाहीं. "इंग्रजांच्या सत्तेनें जें येथील लोकांस शिक्षण मिळालें त्याचा हा दृग्गोचर परिणाम होता व त्यांच्या जोडीनें दुसऱ्या कांहीं शक्ति समाज सुधारणेचा गाडा पुढें ढकलीत होत्या. कायदा ही एक त्यातील शक्ति असून न्यायमंदिरांतून सुटणारीं फर्मानें ही दुसरी प्रबळ शक्ति हिंदुस्थानच्या सामाजिक सुधारणेच्या कार्याला इंग्रजी राज्यांत चालना देत होती." [२] व तिच्याच मुख्यतः प्रेरणेनें हिंदूसमाज रचनेंतील हजारों वर्षांच्या परंपरेनें दृढत्व पावलेलीं व समाजाच्या नैतिक आरोग्याचा फन्ना उडवणारी किती बांडगुळे इंग्रज राज्य–कर्त्यांनीं छाटून काढिलीं. आमच्याकडील समाज सुधारक हे इंग्रजी राज्यापासून उत्पन्न झालेले होते हें खरें आहे पण सनातन समजल्या गेलेल्या, अशा रुढींचा छातीठोकपणें त्यांनीं नाश करण्याचा चंग बांधला हेंच त्याच्यापुढील यशाचें गमक आहे ज्याप्रमाणें बीजापासून निघालेल्या पहिल्या धुमाऱ्यांवरून सुद्धां पिकांविषयीं कसलेले शेतकरी पुढील हंगामाचा नक्की अंदाज करतात त्याप्रमाणे त्या वेळच्या ह्या समाज सुधारकांचें शौर्य व हिंमत पाहिली म्हणजे पुढें येणाऱ्या मोठमोठ्या सुधारकांचें ते अग्रणी होते हे सिद्ध होते.

---

[१] किता पृ. ११५ [२] न्या. मू. रानडे चरित्र—न. र. फाटक—पृ. १०२

# प्रकरण ५ वें

## " मिशनरी लोकांशीं संबंध आल्यानें त्यांच्याशीं जुळतें होण्यासाठीं चाललेली धडपड : त्यामुळें आपल्या धर्मांतील आणखी वेडगळ रुढींचा नाश. "

मागच्या प्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणें इंग्रजी राज्य स्थापन झाल्यापासून इंग्रज सरकारचा व मिशनरी पाद्री लोकांचा असा दृढ ग्रह होता कीं, हिंदु लोकांचें तत्वज्ञान तुटपुंजे, त्यांचे ठिकाणीं कर्मकांडाचा बुजबुजाट, शेंकडा ९० लोकांत अज्ञानाचा संपूर्ण वास इ. इ. गोष्टींमुळें त्यांचा (येथील प्रजेचा) जर खरा उद्धार व्हावयाचा असेल तर तो खिस्त्याला कवटाळल्यानेंच होणार आहे. या एकाच कल्पनेनें पछाडल्यामुळें पाद्री लोकांच्या हातून सामदामदंडभेदादि उपायांच्या योगानें येथील जनतेशीं जो संघर्ष उत्पन्न झाला त्या योगानें दोनही जमातींना धडे घेण्यासारखे मिळाले. पाद्री लोकांना ओळखून आलें कीं, आपलें जें येथील लोकाविषयीं व त्यांच्या तत्त्वज्ञानाविषयीं मत होतें तें पार बदलून टाकावयास पाहिजे हें पहिले. दुसरें असें कीं, सामदामदंडभेदानें जे लोक आपण आपल्या धर्माच्या छत्राखालीं जमा केले ते अशांपैकीं नव्हते कीं ज्यांचें करणें पाहून इतर त्यांच्याच लोकांनीं त्यांचें अनुकरण करावें. तिसरें असें कीं, इकडल्या लोकांच्या रुढी ज्या वरवर वेडगळपणाच्या आहेत त्याही शास्त्राधारें बनलेल्या असल्याने त्यांचें विच्छेदन वा उपहास करून भागणार नाहीं तर शास्त्राच्या आधारानेंच म्हणजे इकडील लोकांच्या मदतीनेंच त्या नाहींशा कराव्या लागतील. व इतकेही करून हे लोक परधर्मांत जातील असा निर्वाळा देता येणार नाहीं. का कीं, येथील लोकांची धर्मश्रद्धा अढळ आहे. हे सगळे धडे शिकावयास पाद्री लोकांना फारच दिवस लागले. आतां आपल्या इकडील लोकांस जे कोणते धडे घेण्यासारखे होते ते इकडील

लोकांनीं घेतले कीं नाहीं, घेतले असल्यास कां घेतले व घेतले नसल्यास कां घेतले नाहीं याचा विचार करूं. पहिली गोष्ट, आपल्या इकडील लोकांस मिशनरी लोकांचा संबंध आल्याने कळली ती ही कीं त्यांच्या धर्मातील साधे-पणा, शाब्दिक मंत्रांचा व निरर्थक तंत्राचा अभाव. आमच्या इकडे पाहिलें तर आमचीं सर्व कर्मे बांधलेलीं व जीं कर्मे स्वतः करावयाचीं तीं करावयास लागणारा वेळ व ज्ञान हीं जवळ नसल्यानें धर्म व आपल्या मधील निरोप्या-दाखल असलेल्या भटजीकडून करावयाचीं असल्यानें आलेले परावलंबित्व, या गोष्टींमुळें इंग्रजी राज्याशीं संबंध आल्यानें प्रथमतः लोकांना अशी इच्छा उत्पन्न झाली कीं हें कर्मकांड मोडावे व तसा प्रयत्न पुष्कळ समाजसुधा-रकांनीं केला.

राजा राममोहन रायापासून आगरकर—कर्वे—महात्मा गांधी पर्यंत सर्वांनीं या बाबतींत प्रयत्न केला. या प्रयत्नामागचें कारण मिशनरी लोकांशीं आलेला संबंध होय. हें कर्मकांड कसें कसें नाश केलें गेलें याचा आतां इतिहास पाहूं.

प्रथमतः हिंदुधर्मावरील मोठा कलंक म्हणजे त्यांचें जें ज्ञानभांडार तें इतर सर्व लोकापासून दडपून ठेवलेले असे. ब्राह्मणांशिवाय इतरांनीं वेद वाचावयाचे नाहींत, पाठ करावयाचे नाहींत, त्यांच्याशीं त्यांचा संबंधसुद्धा नको, याकरतां अगदीं पुरातन काळापासून वाद चालत आहेत. अगदीं ज्ञानेश्वर नामदेवापासून तहत रामजोश्यापर्यंत या वादाची रणधुमाळी चाल-लेली आपणांस दिसते. दर वेळी एकाद्या वीराने पुढें यावे व या वैदिक ज्ञानाचा फायदा इतरजनांना व्हावा म्हणून आपला "कटोरा झाडावा" त्यापासून उत्पन्न होणारा लोकक्षोभ, हिमालयाच्या गंभीरतेनें सोसावा व चालतें व्हावें. जुन्या लोकांनीं वेदातील ज्ञान—प्राकृतांत आणावें व त्यांचा संस्कृत—शास्त्री—लोकांनीं छळ करावा. वेदच "प्राकृतांत आणण्याचा प्रयत्न कोणीच केला नाहीं. वेदांचें सार आणलें असेल. असो तर त्या वादाची सांखळी या आधुनिक समाज सुधारकांपर्यंत येऊन पोंचली. मिशनऱ्यांचा संबंध

आल्यानें व त्यांच्या बायबलच्या इकडील भाषेंत झालेल्या भाषांतरानें तुमचें तें, तर आमचें हें पहा " असें दाखवण्याकरतां वेदांची श्रुतीस्मृतींची भाषांतरें कोणीतरी करावयालाच पाहिजे होतीं. तें काम राजा राममोहन राय यांनीं सुरू केलें. हिंदूंचीं पवित्र पुस्तकें भाषांतरित करण्यास त्यानीं सुरवात केली व जे वैदिक मंत्र शूद्रांनीं ऐकिले असतांही अपवित्र होत, ते आतां नुसत्या शूद्र हिंदूच्याच नव्हे तर मुसलमान व खिस्ती समाजांतील लोकांच्या कंठगत होत चालले. [१] त्यावेळीं मोठा हलकल्लोळ उडाला. काशीच्या ब्राम्हणांनीं हाहाःकार मांडला. शेवटीं मद्रास येथील शंकरशास्त्री यांच्याशी राजा राममोहनांचा कागदोपत्रीं वाद झाला व शेवटीं शंकरशास्त्री यांनीं हार खाल्ली; कारण शेवटच्या राममोहनांच्या पत्रास शंकरशास्त्री यांचे उत्तर आलें नाहीं. + हें बंगाल्यांत झालें. आमच्या इकडे महाराष्ट्रांत देखील लोकहितवादींनीं या, " कांहीं लोकां " करतां जपून ठेवलेल्या ज्ञानावर कोरडे ओढले आहेत. वेदांचा अर्थ करूं नये ... ब्राम्हणांखेरीज कोणी ती वाचूं नयेत, परदेशांत गेलें तर भ्रष्ट होतो अशा नानाप्रकारच्या समजुती त्यांच्या ( हिंदुलोकांच्या ) पाहून ते शतमूर्ख होत." [२] लोकहितवादींना या गोष्टीची इतकी चीड आली आहे कीं, आपल्या इकडील लोक, इंग्रजास–कीं जे ज्ञानानें आपल्यापेक्षां पुष्कळच मोठे आहेत अशी त्याची समजूत होती त्यांस " वानर " म्हणतात. सीतामाईनें वानरांना वर दिला व मग ते हिंदुस्तानचे राजे झाले! अशी जी समजूत आहे त्यास लोकहितवादी म्हणतात कीं तुम्हीं ( हिंदू ) बोलतां ते " डुकर " आहांत ". याला लोकहितवादींची चीड म्हणावी का विनोद म्हणावा हेंच कळत नाहीं. असो. तर याप्रमाणे त्यांचेही मत वेदाविषयीं होते म्हणूनच त्यांनीं आयुष्याच्या अगदीं शेवटच्या काळांत लिहिलेल्या " स्वाध्याय " नामक ग्रंथांत लिहिले आहे कीं " वेदवेदांगाचे दररोज सार्थ

---

[१] Raja Ram Mohan Roy—pp. 21 (" ...The sacred books... Mahomedans." )

\+ किस्ता [२] लोकहितवादी–केळकर पृष्ट ७७-७८

अध्ययन करणें याचें नांव स्वाध्याय...". अशा तऱ्हेची प्रस्तावना करून स्वाध्यायांत ज्यांचा अंतर्भाव होतो ती वेदवेदांगें शास्त्रपुराणें, स्मृती, मंत्रतंत्राचे प्रकार वगैरे गोष्टींची माहिती...दिली आहे ! स्वामी दयानंद हेही आर्यधर्माचे कट्टे पुरस्कर्ते. त्यांनीं "वेदभाष्य" लिहून प्राकृत लोकांना ज्ञानांजन दिले व वेद हे सर्व लोकाकरितां (हिंदू) खुले केले. असें करतांना त्यांनीं हिंदू या शब्दाची व्याख्या बदलली. × "जो वेद हेंच पवित्र शास्त्र समजतो ... तोच पक्का हिंदू... तोच फक्त आर्य!" असें म्हणण्यांत स्वामीनीं आणखी एक पायरी पुढची गांठली आहे. वेदाविषयीं ते म्हणतात कीं, "ज्याप्रमाणे सूर्य व वारा सर्वांकरितां आहेत त्याप्रमाणें वेद हे सर्व लोकांकरतां आहेत." हें सिद्ध करण्यास त्यानीं वेदातीलच आधार दाखवले. स्वामी दयानंदाप्रमाणेंच स्वामी विवेकानंदाचें मत होतें. या समाजसुधारकाशिवाय महाराष्ट्रांत आणखी एक समाजसुधारक निपजले होते. त्यांचें नाव "महात्मा जोतिबा फुले". फुले यांना ब्राम्हणांनीं वेद आपल्यासाठींच राखून ठेवले आहेत याचा इतका राग आला होता कीं, त्यांनीं वेद–ग्रंथ मुळातच असत्यवादी आहेत असें प्रतिपादण्यास सुरवात केली ! बंधनांमुळे आलेली चीड पराकोटीला गेली इतकेंच या संबंधानें म्हणता येईल. ते म्हणतात— "भटानीं आपल्या सत्तेच्या जोरावर मदानें अनेक तऱ्हतऱ्हेचें मतलबी ग्रंथ (वेद) करून त्या सर्वांचा एक मजबुती कोट बांधून त्यामध्ये सर्व दासांस वंशपरंपरेनें लटकावून तेथें त्यांस नाना तऱ्हेच्या पीडा देऊन हा काळ पावेतों मोठ्या मौजा मारीत आहेत. [१] धार्मिक पुस्तकें सर्वांस खुली असावींत असा सर्वांचाच ग्रह झाला होता. हा निःसंशय पाद्री लोकांच्या बायबल प्रसाराचाच परिणाम होय. जसें ख्रिस्त्यांनीं आपलें धार्मिक वाङ्मय सर्वांस फुकट वाटण्याचा क्रम ठेवला होता, त्याचेंच अनुकरण राजा राममोहन राय आदि पुढाऱ्यानीं आपले वेदादिक उपनिषदांसारखे ग्रंथ छापवून बगांली व इंग्रजी भाषेंत भाषांतर करवून फुकट

---

× स्वामी दयानंद तुंगारकृत पृष्ठ १५१

[१] आजकालचा महाराष्ट्र पृ. १०३

वाटवले ! आपल्या इकडे असा प्रयत्न धर्नुधारी व विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनीं केलेला दिसतो !

या नंतर दुसरा विशेष म्हणजे कर्मठपणाच्या धार्मिक दंभास मूठमाती मिळत चालली. राममोहन राय यांनीं जातिभेदाला तिलांजली न देतां फक्त कर्मकांडाचा नाश करण्याचेंच ठरवलें होतें. ब्रह्मसमाजाची स्थापना केल्यावर देवाच्या पूजेचें अवडंबर त्यांनीं काढून टाकलें व नुसते देवाच्या प्रार्थनेची गीतें म्हणून त्यांचा अर्थ सांगितला कीं पूजा आटोपते. असें त्यांनीं आपल्या "ब्रह्मउपासना" नामक ग्रंथांत सांगितलें आहे. दुसरा जो आर्य समाज, त्याने या पूजेचें अवडंबर खोडूनच काढले. पूजा याची व्याख्या ते अशी करतात कीं, "विद्वान, माता, पिता, अतिथी, न्यायकारी, राजा, धर्मात्माजन, पतिव्रता स्त्री व स्त्रीव्रतपती यांचा सत्कार करणें यांसच देवपूजा असें म्हणतात.[१] इतकेंच नव्हे तर यापुढेंही ते सांगतात कीं, "याहून जी विपरीताची पूजा असते ती अदेवपूजा समजावी म्हणून मी यांच्या मूर्तींना पूज्य व पाषाणादी मूर्तींना अपूज्य समजतो." अशा प्रकारचे विचार आमच्या इकडील साधूसंतांनीं प्रकट केले नव्हते असें नाहीं. किंबहुना अजूनही कित्येक त्या पंथाचे लोक आपआपल्या संताच्या आधारावर तसें बोलतातही. पण त्या त्यांच्या विचाराचें उगमस्थान जुन्या संतांच्या वचनांत आहे हें जाणागारे ओळखतात. पण या समाजसुधारकानीं असलीं मतें मिशनरी अगर तत्सम खिस्ती लोकांच्या आचारविचारांच्या दर्शनानेंच बनवलीं होतीं, यांत संशय नाहीं. हा या दोघांमधील मोठा फरक आहे. महादेव गोविंद रानडे हे देखील आपल्या प्रार्थना समाजास "प्राटेस्टट पंथ" म्हणत असत याचें कारण या पंथानें "जुन्या हिंदूधर्मांतील परंपरेनें आलेले जे निषिद्ध विधी किंवा आचार शिरलेले असतात त्यांचा निषेध करणारा, त्यांना धर्माच्या राज्यांतून हांकलून लावणारा जो पंथ तो, प्राटेस्टंट पंथ."[२] असे म्हटलें

---

[१] दयानंद सरस्वती–तुंगारकृत पृ. २२८ [२] न्या. मू. रानडे चरित्र न. र. फाटक पृ. ५५१

असतें. या पंथाची देखील एकंदर पूजा पद्धति ब्रह्मसमाजासारखीच होती. हल्लींच्या काळीं वेळेच्या अभावीं व कामाच्या रगाड्यामुळें लोकांना कर्मठपणाही दाखवितां येणें अशक्य झालें आहे. तरी ज्या काळाचें वर्णन आम्हीं करीत आहों, त्या काळीं कर्मठपणानें न वागणारा माणूस मोठा पापी समजला जात असे. आतां महात्मा गांधी सारखे समाजसुधारक तर कसलेच ढोंग पाळण्यास तयार असत नाहींत. "सदा येतां जातां उठत बसतां...... भगवत् चिंतन" ही त्यांची देवपूजेची व्याख्या आहे. तेव्हां कर्मठपणा हा नष्ट झाला हेंही एक खिस्ती संघटनेचें उघड अंग होय.

तिसरा फायदा म्हणजे आमच्या इकडे देहदंड करून जी ईश्वरप्राप्ती होते असें लोकांत मत होतें त्याचा नायनाट एक तर खिस्ती लोकांच्या धर्माशीं परिचय झाल्यानें, व दुसरें इंग्रज सरकारच्या कायद्यानें झाला. लोकांत नानाप्रकारच्या समजुती वास्तव्य करीत होत्या. या जगांतील सारें मिथ्या आहे. पर लोकांतील इष्ट प्राप्तीकरितां इह लोकींचीं सुखें तर टाकावींच पण त्यासाठीं देहत्याग न करतां आल्यास निदान देहदंड तरी बांधावा अशी लोकांची समजूत होती. अद्यापीही कांहीं ही समजूत नाश पावली आहे असें नाहीं. पण कायद्यानें बंदी असल्यानें असे प्रकार दृष्टोत्पत्तीस येत नाहींत. येवढें मात्र खरें कीं जे असले प्रकार अजून जिवंत आहेत ते फक्त अगदीं अडाणी व अशिक्षित लोकांतच आहेत. शिकलेल्या लोकांतून त्यांचें उच्चाटन होत चाललेलें आहे. हे प्रकार असे होते. "रजपूत जातींत कन्यावधाचा प्रकार होता. रानटी लोकांत नरमेधाचा उत्सव असे व तो त्यांचा एक प्रकारचा अलिखीत हक्कच आहे असें समजण्यांत येई, डोंगरावरून उडी टाकून जीव दिल्यास देव भेटतो. गंगा तटाकावर मरण आल्यानें मुक्ति मिळते."[१] असले वेडगळ आचारविचार सरकारनें केलेल्या कायद्यानें बंद करण्यांत आले. हा कायदा अगदीं मिशनऱ्याच्या सहवासानें आला असें म्हणतां जरी येत नसले तरी मिशनरी ज्या जातीचे होते त्यांच्या जातीच्याच

[१] न्या. मू. रानडे चरित्रावरून पृ. १०३.

व कल्पनांच्या लोकांकडूनच हे निवारले गेले म्हणून त्यांचा जातांजातां उल्लेख केला. "खिस्ती मिशनऱ्यांनीं १८४०-६० चे दरम्यान साऱ्या देशभर आपलीं वसतिस्थानें उभारून हिंदू-मुसलमानांच्या धर्मावर आपल्या व्याख्यान लेखनादि तोफांचा अतिशय निकरानें मारा चालविला होता...त्यांनीं हिंदू-समाजाच्या धार्मिक रीतीरिवाजांचा चुराडा उडवण्याकरतां संधी सांपडेल तेथें नालस्तीच्या घणाचे घाव मारण्याचा क्रम ठेवला होता". [1] त्या योगानें हिंदु-धर्मातील विचारी मंडळी जागी झाली. मिशनऱ्यांचा स्वतःचा हेतू कोणताही असो, त्यांनीं केलेल्या या हिंदुधर्मावरील धूमधडाक्यानेंच आम्ही जागे झालों हें खरें.

आपण आतांपर्यंत झालेल्या फायद्यांचे निरीक्षण केले व त्याचा इकडील लोकांनीं कसा उपयोग करून घेतला हेंही पाहिलें, पण यापेक्षां देखील या गोष्टींचा उपयोग वेगळ्या तऱ्हेनें येथील समाजसुधारकांनीं करून घेतला. ह्यांत मुख्यतः पहिलें नांव म्हणजे राजा राममोहनाचेंच होय. त्यांनीं ब्रह्म-समाजाची स्थापना केली. "या ब्रह्मसमाजानें हिंदूधर्माच्या तटबंदीला बाहेरच्या शत्रू ऐवजीं आंतून पोखरून भगदाड पाडणारा नवा पंथ उत्पन्न केला." [2] या पंथाविषयीं सविस्तर माहिती पुढच्या एका प्रकरणांत येणार आहे. तेव्हां त्याचा साकल्यानें विचार करूं. सध्यां नुसता नामनिर्देश केला. तो करण्यांत हेतु हा आहे कीं, जरी आमच्या इकडील लोकांना पाश्चात्य मिशनऱ्यांच्या संसर्गानें नवनवीन सुधारणांची गोडी लागली होती तरी त्यांनीं आपलें सत्व सोडलें नव्हतें. राजा राममोहनराय हे धर्माचे बाबतींत उदार असत. ते खिस्त पैगंबर यांचीही स्तुति करीत. "बैबलांतील कित्येक गोष्टी सुरेख रंगवून भक्तिभावानें सांगत एवढेच नव्हे तर खिस्ती धर्मातील "ट्रिनिटी"चें तत्व मूर्तिपूजेवर कसें आधारलेलें आहे याचे त्यांनीं एका "ट्रिनिटीच्या" तत्वाच्या अभिनिवेशाने त्याचा प्रसार करण्याकरितां आलेल्या ह्या पाद्र्यालाच ह्यांतील फोलपणा कळवून दिला! खिस्ती धर्माचें त्यांचें तत्व-

[1] किता पृ. १०५ [2] किता पृ. १०७

ज्ञान इतकें गोडें होतें कीं, राजा राममोहन हे लवकरच खिस्ती होणार असें त्यावेळच्या बिशप मिड्लटन्‌ला वाटलें व त्यानें त्याप्रमाणें त्यांना खिस्ती होण्याबद्दल विचारलेही ! " * किती हे धाडस व काय हें मौर्ख्य ! त्यांच्या मतीप्रमाणें राजा राममोहन हे बाटावयास योग्य होते पण आमच्या लोकांची स्वत्वाची जाणीव अजून विझली नव्हती. खिस्ती धर्माच्या सहवासानें आपणांला त्यांच्यापासून कांहीं चांगलें काय येतां येईल व आपली सुधारणा कशी करतां येईल अशी विवक्षा येथील समाजसुधारक करीत होते व म्हणूनच चांगल्या तत्वांचा मग तीं खिस्ती असोत अगर मुसलमानी असोत अवलंब करावयाचा, हें उदार धोरण विकृत दृष्टीनें आमच्या समाजाकडे बघणाऱ्या खिस्ती मिशनऱ्यांना कळलें नाहीं. महाराष्ट्रांत जो प्रार्थना समाज निघाला त्याला देखील अशींच स्वतंत्र कारणे आहेत. खिस्ती धर्म पद्धतींतून या पंथानेंही कांहींच घेतलें नाहीं असें म्हणणें वावगें होईल. पण ते सर्वच्या सर्व खिस्तीच बनले असें जे कांहीं लोक म्हणतात ते उगाच आकसानें म्हणतात असें दिसते.

स्वत्वाची अशी जाणीव असल्यानेंच महाराष्ट्रांत काय किंवा बंगाल्यांत काय खिस्ती मिशनऱ्यांच्या प्रयत्नावर स्वयंभू प्रयत्नांनीं विरजण पडूं लागलें. स्वत्वाच्या या निदर्शनाला कित्येक ठिकाणीं हिंदूकडूनही विकृत स्वरूप दिलें गेलें हें खरें आहे. तरी पण आपल्या जवळ कांहीं सांगण्यासारखें आहे अशी जाणीव असल्यानेंच हिंदुधर्माची तरफदारी करणारी मंडळी पुढें आली. या मंडळींत १८५६ सालीं विष्णुबुवा ब्रम्हचारी यांचें नांव सगळीकडे फार गाजलें. × मिशनऱ्यांनीं केलेल्या हल्याला बरोबर प्रतिहल्ला कसा करावा हें बुवा जाणून होते. त्यांची प्रतिकार शक्तीही दांडगी होती. हजर जबाबीपणानें कोट्या लढवून आपला मुद्दा गुद्यानेंही सिद्ध करण्यास ते तयार असत. मिशनरी लोकांनीं जर वेडेवांकडे चार करून आपल्या पंखाखालीं हिंदुधर्मांतील सावजें घेण्याचा प्रयत्न केला नसता तर

* आधुनिक भारतावरून × न्या. मु. रानडे चरित्रावरून.

विष्णुबुवासारखे लोकही समाजांत तयार झाले नसते असें वाटतें. सोलापूरचे धनुर्धारी "वाईकर भटजी" या प्रख्यात कादंबरीचे कर्ते, श्री. टिकेकर यांनींही अशीच परधर्मीयांची लाट परतवण्याकरितां छोटी छोटी पुस्तकें लिहून काम केलें आहे. अगदी पहिल्यापहिल्यादा पुष्कळ अर्धशिक्षित व अडाणी लोक मिशनऱ्यांच्या काव्याला बळी पडले. "शिवाय मिशनऱ्यांच्या गोटांत पुष्कळ ब्राम्हण शिरल्यानें आपला धर्म डुबवाईस आला असा ग्रह होऊन लोकांमध्यें खळबळ माजली. इंग्रजी विद्या, कायदा, न्याय आणि मिशनरी अशा चतुरंग दळाच्या वेढ्यांत सांपडलेला हिंदुधर्म आपल्यावर चाल करून येणाऱ्या सामर्थ्याच्या प्रतिकारासाठीं सज्ज होता."[1] ती सज्जता त्यानें कशी केली हें आपणांस पुढील प्रकरणांत पहावयाचें आहे.

---

[1] न्या. मू. रानडे चरित्र—न. र. फाटक पृ. १०६.

# प्रकरण ६ वें

"धर्म ही सार्वजनिक गोष्ट. तिच्यावरच तरवार धरल्यानें समाजांतील बऱ्याच, मोठ्या व क्षुद्र रूढी, चिरडल्या गेल्या."

मागील प्रकरणांत खिस्ती मिशनरी लोकांशी संबंध आल्याने आमच्या लोकांच्या धर्माच्या कल्पनांत कसा फरक झाला, त्यांनीं त्यांच्यापासून (मिशनऱ्यांपासून) धडे घ्यावयाचे ठरविलें, ते कोणते व कसें घ्यावयाचें ठरविले त्यापैकीं कांहीं गोष्टींचा विचार आपण केला. आतां धर्मासारख्या सर्व लोकांना सदा प्रिय असलेल्या गोष्टींची सुधारणा करीत असतांना आणखी कांहीं धार्मिक व त्याबरोबर समाजांतील अहितावह चाली कशा बंद झाल्या तें पाहूं. हिंदुधर्मांत फार पूर्वीपासून म्हणजे वैदिक काळाच्या नंतर जो पुराण काळ आला तेव्हापासून मूर्तीपूजेचें बंड सुरूं झालें. स्वामी दयानंद म्हणतात कीं, महाभारतांतील महायुद्ध संपल्यापासून हिंदुस्थानास अशा मूर्तिपूजेचा रोग जडला. पाद्री मिशनऱ्यांशीं संबंध आल्यानें आमच्या इकडील मूर्तिपूजेचा नाश करण्याचें इकडील लोकानीं मनांत आणले, असें विधान केल्यावर असा प्रश्न विचारण्यांत येतो कीं, ब्रिटिशांचा हिंदूलोकांशीं जो संबंध झाला त्यापूर्वीं मूर्तिभंजक अशा मुसलमानांशी सुद्धां हिंदु समाजाचा संबंध आलेलाच होता. मग त्यावेळीं जे लोकांस सुचले नाहीं अगर उद्भवलें नाहीं तें आतांच, या वेळीं कां? मुसलमानांचा नाहींतरी चांगला ४००–५००

वर्षें संबंध आला आहेच कीं ! यासंबंधीं विचार झाला नव्हता म्हणावें तर, अगदीं अकबर बादशहाचे वेळीं अबुलफजल वगैरे लोकांनीं या दोन्ही धर्मां-तील उच्च व भरीव विचार एकत्र करून " ऐने अकबरी " हा धर्मपंथ स्थापावयाचा विचार केला होता कीं नाहीं ? पण या एकट्या प्रयत्नाशिवाय नंतर एकही प्रयत्न होऊं नये इतके या धर्मांमध्यें अंतर होतें काय ? आमच्याकडे पहावें, तर मुसलमानांच्या मशिदीच्या मागें वा पुढें हिंदु मंदिराचें दार असून एकाद्या मुसलमानानें दिलेली ' बांग ' आमच्या कांकड आरतीच्या गोंधळांत देखील देवाच्या कर्णरंध्रांत शिरण्या इतकी जोरानें दिलेली आढळते! हें असें होण्याचें कारण, असें असावें कीं इस्लामधर्म संस्थापकांनी आपला जो धर्म वाढवला तो एकतर तरवारीच्या जोरावर अगर राजसत्तेच्या जोरावर! आपल्या तत्वज्ञानाच्या परिशीलनानें अगर लोकांस समजावून देण्याने मानसिक क्रांति करून त्यांनीं कोणालाही मुसल मान धर्माला कवटाळण्यास लाविलें नाहीं, हें त्याचें मुख्य कारण आहे. म्हणजे याचा अर्थ एवढाच होतो कीं, मुसलमान लोकाचे संख्या बळ जें इतकें वाढलें तें इस्लाम धर्माचें तत्वज्ञान लोकांना आवडलें म्हणून नव्हेच नव्हे. पण तरवारीच्या व आमिषाच्या जोरावर पाहिजे तर म्हणा, मुद्दां नसून त्यांचें इंगित हिंदुधर्माच्या एका कलंकात आहे. तो कलंक म्हणजे असा कीं रूढीचे दास्यत्व! रुढीचे दास्यत्व म्हटल्यावर पुष्कळ जणांची समजूत अशी होईल कीं ज्यांनी त्यांनी उठावें व रुढीवर अजाणते प्रहार करावेत. आम्ही जाणतो कीं रुढी ही आपाततः वाईट नाहीं. उलट रुढी ही स्वाभावीकच असून तिच्याशिवाय माणसांचे व्यवहार बिनधोक व विनासायास चालणारच नाहींत. कां कीं, रुढी ही एक समष्टि पुरुषाची संवय आहे. ज्याप्रमाणें संवयीनें कष्टाची कामें सुकर होतात त्याप्रमाणें समाजपुरुष रुढीच्या पायांनीच सरकत असतो. व जेव्हां रुढीचे बंड मोडा व तिचा नाश करा असा संदेश समाज-सुधारक देत असतात तेव्हा जुनी व वाईट रुढी-कीं, जिच्यापासून समाजाचें पाऊल वांकडें पडत आहे, ती मोडून टाका असें म्हणतात. याचा अर्थ जुनी मोडा व नवी रुढी प्रचारांत आणा असा आहे. जो रुढी मोडून

टाका असाच आग्रह करीत आहे व नवीन मार्ग सुचवीत नाहीं तो खरा समाज सुधारकच नव्हे. आपल्या इकडील प्रत्येक सुधारकानें नवीन पंथ- दाखविलेला आहे. "Old order changeth yielding place to new." या उक्तीप्रमाणें नवीन रुढी म्हणजे समाजाचा जिवंतपणा होय. असो तर याप्रमाणें हिंदुधर्मांतील व त्यातील व्यक्तींवर परधर्मांचें संकट आलें असतां जबरदस्तीनें वाहवलें जात असतां, हिंदुधर्मीयांनीं अशा निरपराधी बाटलेल्यांस जे दुर लोटलें ते कायमचेंच. धर्मांतरितांस हिंदुधर्माचें दार कायमचें जे बंद केलें गेलें ते कधींही उघडण्यांत आलें नाहीं. जो एकदां चुकीनें कां होईना गेला, तो कायमचा अंतरला असें झालें. धर्मांतरितांस पुन्हां शुद्धी नाहीं अशी जुनी रुढी ती हिंदुधर्मांवरील केव्हां तरी कलंक होता असें आमचें म्हणणें. या कलंकामुळें इच्छा असूनही ज्यांना परत आपल्या धर्मांत येतां आलें नाहीं. त्यांनीं त्या तशा स्थितींतही हिंदुधर्मांतील आचार विचार व देवतार्चन अजून जसेच्या तसे पाळलेले कित्येक इस्लामधर्मीयांत अजून दिसतें! तेव्हां हा जो रुढीचा कलंक ह्यानेंच इस्लामधर्मांचा जरी प्रसार केला नाहीं तरी तो टिकविण्यास मदत केली! मूर्तिपूजेचा नाश इस्लामधर्मीय सक्रिय करीत. वादविवादांत जिंकून त्यांचे म्हणणें त्यांनी कधींही सिद्ध केलें नाहीं. शिवाय मूळचे जे खेर इस्लामधर्मीय कडवे प्रचारक हेही हळूं हळूं कमी होत गेले. व तेथील बाटलेल्या इस्लाम धर्मीयांना एकतर विचार करण्याची, तत्त्वज्ञान शोधून काढण्याची, बुद्धि झाली नाहीं व विशेषशी उत्सुकताही वाटली नाहीं. म्हणून मूर्तिपूजेचा विध्वंस हे मनानें कोणीही बदलूं शकलें नाहीं. उलट हिंदूच्या मूर्तिपूजेचा राज्यशासनाचे स्थैर्याकरितां तेथील मुसल- मान राजांना पाठपुरावा करावा लागला हे त्यांनीं आपल्या कारकीर्दींत मोठ- मोठ्या जुन्या व नवीन देवालयाला दिलेल्या वर्षासनावरून व देणग्यावरून सिद्ध करतां येईल.

हिंदुधर्म हा तत्वज्ञानावर अधिष्ठित असल्यानें, आपल्यापेक्षां वरचढ तत्त्वज्ञान भेटल्याशिवाय म्हणजेच मानसिक क्रांती केल्याशिवाय तो कधींही

आपल्या नेहमीच्या मार्गापासून परावृत्त होणार नाहीं. मागें बुद्ध धर्माची जेव्हां लाट देशावर आली तेव्हां हिंदुधर्मांतील एका विशिष्ठ तत्त्व प्रणालीच्या नवीन मांडणीला लोक भुलले व भराभर सारा आर्यावर्त बुद्धधर्मीय झाला. त्यावेळीं जबरदस्तीचे काहीं कारण पडलें नाहीं. आपण आपला धर्म सोडतो आहोंत असा संशयही त्यावेळीं हिंदूना आला नाहीं. तत्त्वें आपलीं त्यांची मांडणी वेगळी! पण पुन्हां जेव्हां परत हिंदुधर्माची सारवासारव केली गेली, तेव्हां शंकराचार्यांच्या सारखा एकट्या धर्म-शिलेदाराच्या तत्त्व प्रणालीवर सारा भारतवर्ष पुनः पूर्वपदाला म्हणजे हिंदुधर्मात आला. परकीयांना असें आश्चर्य वाटावें कीं, एकट्या मनुष्यानें वाद करून सर्व प्रजेला धर्म बदलविण्यास लावावे ही केवढी आश्चर्याची गोष्ट! पण आम्ही हिंदू लोक, आहोंत खरे असे. तेव्हां मुख्य मुद्दा असा होता कीं, इस्लामधर्मी यांपासून मूर्तिपूजेचा नाश व्हावा असें समाज सुधारकास कां वाटलें नाहीं, याचा असा संबंध लागतो.

ख्रिस्ती लोकांचा जो संबंध आपल्याशीं आला तो अगदीं वेगळ्या भूमिकेवर! त्यांची राज्यशासन पद्धती श्रेष्ठ, आधिभौतीक ज्ञानांत ते आपल्या-पेक्षां वरचढ, अशी स्थिती असल्यानें ज्याप्रमाणें पाणी वरच्या पातळींतून खालच्या पातळींत जातें त्याप्रमाणें ख्रिस्ती लोकापासून ज्ञानगंगा आमचेकडे वाहूं लागली व तिच्यांत आमच्याकडील सुधारक आकंठ डुंबूही लागले. ज्ञान, मग ते कोणांकडूनही येवो त्याचा फायदा घ्यावा. हें जणुं आमचे-कडील लोकांचें व्रतच आहे. मग त्यांत कोणत्याही क्षुल्लक गोष्टींच्या अभि-निवेशानें खंड पडूं द्यावयाचा नाहीं. अशा वृत्तिमुळें तिकडील ज्ञानसांठा आमचेकडे येऊन जांगड पडूं लागला. या ज्ञानसागरांत अगदीं भक्ति-भावानें आमची मंडळी डुंबत असलेली मिशनऱ्यांनी पाहिली तेव्हां त्यांना आनंद झाला व त्यांनी खूणगांठ आपले मनाशीं बांधली कीं, एक दिवस असा उजाडणार आहे कीं, त्या दिवशीं हें हिंदुस्थान वा हिन्दीस्तान हें नांव जाऊन तेथें ख्रिस्तीस्थान होणार! आणि या अनुमानाप्रमाणें ते वागण्याच्या तयारीला लागले. अर्थात त्यांचे गणीत मांडावयास चुकलें असल्यानें उत्तरही

त्यांना चुकीचें मिळालें व वर काढलेला त्यांचा कयास चुकला हें आपण पहातोंच. तो कयास कसा चुकला हे आपण मागील प्रकरणांत पाहिलेंच आहे. प्रथम सांगितल्याप्रमाणें हिंदू धर्मीयांनीं मूर्तिपूजेचें थोतांड मोडून काढण्याचे ख्रिस्तीधर्माशींच संबंध आल्यानें, कां सुरू केलें याची मीमांसा आपल्यास करावयाची आहे ते सांगण्याकरिता पूर्वीचा एवढा इतिहास सांगावा लागला.

ख्रिस्ती धर्म, त्याचा जो साधासुधा नीटनेटकेपणा, कर्मधर्माचें थोतांड नाहीं, शुद्ध प्रेमाच्या तत्त्वावर स्थापलेला, पाहून आमचे लोक भुलले. ख्रिश्चन मिशनऱ्यानीं सुद्धां जास्त कडवेपणानें न घेतां तत्वज्ञानाच्या आधारावर हिंदू लोकांचें मन वळविण्यास सुरवात केली. प्रथमत: अर्धशिक्षित भुलले पण तोही ओघ, धर्मांतराचा, कसा थांबवला गेला हें मागच्या प्रकरणीं उल्लेखिलेलें आहेच. मूर्तिपूजेसंबधीं मात्र जेव्हां जेव्हां पाद्री लोक हिंदूदेवतांची थट्टा करीत तेव्हां त्यांत थोडें खरें असावें असे येथील लोकांस वाटूं लागलें. प्रथमतः हा प्रचार कलकत्याकडे सुरू झाला, तेव्हां कलकत्याच्या कालिदेवीचे भक्तगण रोज हजारों बकरीं देवीपुढें बळी देत! पुष्कळ विचारी पुरुषांस हें आवडत नसेलही. पण धर्माच्या नांवाखालीं चाललेल्या या महायज्ञाला कोण आवरणार! तोंडानें बोलावें तर तें तोंड बहिष्काराच्या जालीम शस्त्रानें बंद व्हावयाचें म्हणून विचारवंत लोक व्यक्तिशः आपल्यापुरता धर्म,—मूर्तिपूजा विरहित असा, पाळीत. ईश्वरचंद्र विद्यासागर हे अशांपैकीं गृहस्थ होते. ते हिंदू धर्माचेच होते परंतु ते कधीं देवदर्शनाला जावयाचे नाहींत. परमेश्वराची पूजा मात्र ते मानसिकरीत्या करीत असतील. त्यांस मूर्तिपूजा फारशी मान्य नसावी. त्याच्या आईससुद्धां ती (मूर्तिपूजा) मान्य नव्हती...ती ब्राह्मी नव्हती परंतु तिच्या माहेरी मोठमोठे पंडित झालेले असल्यामुळें तिची बुद्धी सूक्ष्म व कुशाग्र झाली होती." [१] या वरील उताऱ्यावरून असें अनुमान काढल्यास हरकत नाहीं कीं मोठमोठें शास्त्री पंडितही मनांतून त्यावेळीं मूर्तिपूजेच्या

---

[१] ईश्वरचंद्र विद्यासागर पां. स. साने पृ. १६३, ६४.

विरुद्ध होते. आपल्या इकडे तर ही प्रथा फार पूर्वीपासूनची आहे. वारकरी सांप्रदायाचे महान् संत सगुणोपासकच असताना त्यांची वृत्ति दगडाच्या मूर्तिवर अतिम निष्ठा ठेवण्याइतकी कमजोरही नव्हती. तीर्थी धोंडा आणि पाणी। देव रोकडा सज्जनीं ॥ ही तुकाराम महाराजाची उक्ति तरी हेच दर्शविते. असो. तेव्हा, कलकत्त्याकडे जेव्हां मिशनरी लोकांनीं उघड उघड आमच्या मूर्तिपूजेची हेटाळणी करावयास सुरवात केली तेव्हा त्यांना राजसत्तेचे प्रच्छन्न सहाय्य होते व दुसरे असे की, एतद्देशीयाच्या बहिष्काराच्या शस्त्रापासून ते निर्भय होते. अशी जेव्हा परिस्थिति आली तेव्हां सगुणोपासनेविषयीं उघड चर्चा करण्याला प्रस्ताव मिळाला. सगुणोपासनेचे भक्त तर निगरगट्टच होते. त्यांनीं या मिशनऱ्याच्या वक्तव्याला कोल्हेकुईची उपमा दिली व याकडे दुर्लक्ष केले. पण विचारी व धर्मनिष्ठ लोकांना स्वस्थ बसता येईना. त्यानीं मग हालचालीला सुरवात केली. पहिले सुधारकाग्रणी राजा राममोहन राय याच्या लक्षात ही गोष्ट आली व त्यांनीं मूर्तिपूजेच्या विध्वंसनेचे पहिले शिंग फुंकले. मूर्तिपूजेच्या विध्वसनाला यावेळींच का सुरवात झाली याचे हे विवेचन आहे. ख्रिस्ती मिशनऱ्याच्या सहवासानेच इकडील लोकाना ही कल्पना सुचली हे निर्विवाद सत्य होय. एकदां सुचल्यावर निर्भयतेनें त्यानीं मार्ग आक्रमण्यास सुरवात केली व ब्रह्मसमाज या नवीन व अभिनव संस्थेची स्थापना बंगाल्यांत केली. त्याच्या पावलावर पाऊल टाकून म्हणजे त्यांच्या स्फूर्तीचा वांटा उचलून महाराष्ट्रातील सुधारकानीं प्रार्थना समाजाची स्थापना केली. गुजराथमधील एका समाजसंस्थापकाने अलोट व अचाट बुद्धिसामर्थ्यावर या दोन्ही पंथावर कडी करणारा, आर्यसमाज या नांवाचा नवीन जोरदार पंथ स्थापन केला. याचवेळीं आणखी एका पंथाचा उल्लेख केला पाहिजे. तो या पंथाचा कीं ज्याचे नांव "थिऑसफिक पंथ" असें आहे. थिऑसफीचा उगम जरी परदेशस्थ असला तरी त्या पंथाचे कार्य व ध्येय हीं वरील तीन पंथांच्या ध्येयाशीं एकरूपच असल्याने तोही पंथ येथे रुजला. या सर्व पंथांच्या मुळाशीं मूर्तिपूजेचा विध्वस हा आहेच. या चारही पंथांचीं कार्यें कशीं घडलीं व त्यांच्यावर कोणत्या गोष्टींचा परिणाम झाला हे आपण पुढच्या एका

स्वतंत्र प्रकरणात विवंचू. समाजातील काही क्षुद्र भावनाही नाश पावल्या त्यांचा थोडक्यात विचार करूं.

पुष्कळ वेळा वर्णाश्रमधर्म पालन करण्याकरितां पुष्कळ विहित कर्मे सागितलेलीं होती. त्यांच्यामागे असलेली धार्मिक व मानसिक उन्नतीची भावना जाऊन आता हीं नुसतीं तत्रे राहिलीं आहेत. तरी रुढींनी जखडलेले लोक तीं नियमानें पाळीत. त्या योगे शारीरिक क्लेश झाले तरी चालतील अशी त्यांची कल्पना होती. एकदा धार्मिक सुधारणा सुरूं झाली, तिच्या त्या ओघाबरोबर ही लहान सहान तत्रेहि वाहून गेलीं. याद्दष्टीने हा एक मोठा सामाजिक फायदाच झाला. प्रथम प्रथम या लहानसहान बाबतींत उगाच पडूं नये असे समाज-सुधारकांचे मत होते. राजा राममोहन राय यांनीं ब्रम्हसमाज काढला व त्यांत मूर्तिपूजेचा नाश केला पण रूढीने घालून दिलेल्या नियमाप्रमाणें ते यज्ञोपवीत वापरीत. " He clung to certain superstitious observances such as the maintainace of the Brahmanical thread and the recitation of the vedas by Brahmins " या वरून कदाचित् गीतेत सागितलेल्या तत्वाप्रमाणे, " न बुद्धिभेद जनयेत् अज्ञानां कर्मसगिनाम् ।" त्याना अज्ञानी लोकांचा वृथा बुद्धीभेद करावयाचा नसेल. पण त्याच्या नतर जे लोक समाजसुधारक म्हणून पुढे आले त्यांनीं या गोष्टीचा उच्छेद करण्याचा धूमधडाकाच लावला. आर्यसमाजानें याबाबतींत फार मोठें कार्य केलें. एकादा आपला जवळचा नातेवाईक वारला तर त्याच्या-बद्दल वाईट वाटणे हे जसे साहजिकच आहे त्याप्रमाणें त्याला वारून पुष्कळ दिवस झाले असले तर "स्मृती मृताची विसरून जाणे, असे मनुष्य स्वभाव हा ॥" हीही गोष्ट तितकीच खरी आहे. कदाचित् मेलेल्याला आपल्या विषयींचा फारच जिव्हाळा वाटत असला तर त्याचें स्मारक वगैरे करून त्याची निदान आपल्या मृत्यूपर्यंत तरी आठवण राहावी असें वाटणें अगदीं साहाजिकच आहे. पण ह्याकरिता अगदीं वर्षावर्षास अथवा महिन्या महिन्यास 'तूप, तीळ, तांदूळ, नासणे' फार अयोग्य आहे असं स्वामी दयानंदानीं अगदीं ठासून सांगितलें. श्राद्ध हे पुष्कळ वेळां अज्ञाणी लोकांत संकट होऊनच बसतें. 'गांवजेवण' हा

त्यांतील मुख्य भाग असतो. कधीं कधीं ज्ञातीभोजनही अवश्य असते. अशावेळीं धर्मकृत्य म्हणून घराणींच्या घराणीं भिकेस लागलीं आहेत. माळ-व्यांत परमार ( पवार ) नांवाची ज्ञाती आहे. त्यांच्यात ही ज्ञातीभोजनाची वहिवाट आहे. ज्ञातीभोजन म्हणजे कांहीं लहान सहान काम नव्हे. तेव्हां अशा जुलमाविरुद्ध आर्यसमाजानें चांगले कार्य केले. श्राद्धानें भटभिक्षुकांचा फायदा होतो एवढेच खरें. × महाराष्ट्रात अगरकरांच्या सुधारकानें श्राद्धा-विरुद्ध अशाच प्रकारचा प्रचार केला होता. नुसत्या श्राद्धांवरच नव्हे तर बारीक सारीक गोष्टींवर त्यांचा कटाक्ष होता. ते म्हणतात " या देशांत भास्कराचार्यांसारखे ज्योतिषी होऊन गेले त्या देशात अजून पर्यंत चंद्रग्रहण किंवा सूर्यग्रहण आलें असता कांहीं वेळ थंड पाण्यात निष्कारण बुड्या मार-ण्याची, उपवास करण्याची, भलभलत्या वस्तूंची दान करण्याची, मूर्खपणाच्या मंत्राचा जप व सिद्धी करण्याच्या फंदांत पडण्याची, पापड लोणच्यावर व दहींदुधावर तुळशीपत्र घालीत बसण्याची व जणूकाय आपणांस सुतक्यानेंच स्पर्श केला आहे असे समजून स्त्री पुरुषाने धोतरा पातळा सगट डोक्यावरून पाणी घेण्याची चाल अजूनपर्यंत दृष्टीस पडावी काय ? " १ अशातऱ्हेनें इतक्या खोलपर्यंत व तपशीलवार धर्म समजुतीसंबंधाने त्यांनीं विचार प्रकट केले आहेत. बंगाल काय व महाराष्ट्र काय किंवा इतर प्रात काय, सगळीकडेच हीं बंधनें जाचक अतएव त्याज्य अशी जी विचाराची लाट निघाली तिच्या बुडाशी धर्म सुधारणेचा मार्ग शक्य तो साधा व सुटसुटीत करण्याचा उद्देश होता, आणि हा सारा परिणाम ख्रिस्ती मिशनऱ्याच्या संगतीचा, त्यांनी दिलेल्या उदार शिक्षणाचा व त्याच्या उदार मतवादी वाङ्मय वाचनाचा होता व म्हणूनच सभ्यपणाच्या मर्यादा न सोडतां समाजाच्या हितास्तव ज्याला जी गोष्ट बरी वाटेल ती त्यानें उघडपणें बोलून दाखविणे यांतच समाजाचें कल्याण आहे ! " असें आगरकरांनी बोलून दाखवले आहे. हे स्पष्टपणे बोलावयाचें धाडस जें आलें तें देखील शिक्षणाचा परिणाम म्हणूनच उत्पन्न झालें आहे.

---

× Swami Dayanand-His life and Teachings pp. 151.

१ आगरकर चरित्रावरून—आळतेकर पृ. २२४.

मनास येईल तें स्पष्टपणें रोखठोकपणें सांगणें हा धर्मकार्यांतील निर्भयपणा उत्पन्न झाला होता त्याला पोसावयाचे काम समाजानेंच केले. आर्यसमाजानें केलेल्या आणखी एका कार्याचे विवेचन करुन हें प्रकरण पुरें करतों. जसें श्राद्धाचें तसेंच मर्तिकासंबंधानेही आपले विचार त्यांनीं स्पष्ट मांडले आहेत. ते म्हणतात कीं..." But the evil most loudly calling for a reform is the Anteshti or the cremation ceremony." [१] इतकें बारीक लक्ष समाजसुधारकांचें लागलें होतें हें दाखवले म्हणजे माझें काम संपलें. पुढील प्रकरणांत जे चारही समाज स्थापन केले त्यांचा परामर्ष घ्यावयाचा आहे.

---

[१] Swami Dayanand. pp 157.

# प्रकरण ७ वें

## " लोकांच्या धर्मविषयक गरजा भागविण्याकरितां निरनिराळ्या समाजांच्या स्थापना. "

' अथातो ब्रह्मजिज्ञासा। म्हणून धर्मप्रवचनाचा व विचारांचा उगम व्हावयाचा हें आपल्याकडे पूर्वीपासूनचेच आहे. ज्यावेळीं धर्म हा फक्त क्रियेंत व कर्म कांडांतच वावरत होता, लोकाजवळ अज्ञान पुरेपूर भरलें होतें. तेव्हां त्यांना तसेंच अज्ञानांत ठेऊन आपली तुंबडी धार्मिक दलाल भरीत होते. इंग्रजी राज्य आलें त्याबरोबर सगळ्याच बाबतींत नवयुग सुरू झालें. नवविचारांचा सळसळता प्रवाह संचरूं लागला. हीण कोणतें आणि नंबरी कोणतें अशी पृच्छा सुरू झाली. आधींच्याच कुजक्या झालेल्या धर्म-मंदिराच्या दारावर परधर्मीयांचे धक्के जोरानें बसूं लागले. इतके दिवस धर्मावर हल्ला न येतां व्यक्तीवर येत असे तो आता धर्माचा पायाच डळमळीत करणारा मिशनऱ्याचा हल्ला आला. " आकाशांतला बाप दयाळू आहे त्याच्या मिठींत या. " " पश्चात्ताप करा, का कीं आकाशाचें राज्य जवळ आलें आहे. " [१] इत्यादि इत्यादि वाक्ये हिंदी जनतेच्या कर्णपथावर सारखीं येऊं लागलीं. अशिक्षितांनाच नव्हे तर विचारवंतांनाही वाटूं लागलें कीं, " खरंच आपलें कुठें चुकते आहे कीं काय ? " पाश्चात्यांचा धर्म, पाश्चात्य राज्य,

---

[१] निबंधमाला चिपळूणकर पृ. १०७

पाश्चात्य राज्यकर्ते आणि चालीरीती या सर्वांविषयीं अनुकूल मत पसरविण्यास ( मिशनऱ्यांच्या ) त्या उपदेशाची भरपूर मदत झाली. " [१] पण लवकरच आमचेकडे आत्मशोधनाला सुरवात झाली. आमच्या धर्मांतील चुका मिशनऱ्यांनीं आधी दाखवल्याच होत्या त्या सुधारतांना अर्थात् अहेतुक कां होईना ख्रिस्ती लोकांचें अनुकरण होणें अगदीं अपरिहार्य होतें. पण सुधारलेल्या चुका हिंदू धर्मांत राहून त्या हिंदू धर्माच्या पद्धतीनेच सुधारल्या गेल्या हे त्याचें विशेष आहे. दादू, नानक, कबीर, तुकाराम, एकनाथ आदि कवींनी सगुणोपासनेचीच भक्ती केली पण ती अंतिमतः, निर्गुणभक्ती सारखीच होती. त्या सर्वांचें म्हणणें या लोकांपुढे होतेच. तेव्हा या सर्वांचा मिलाफ होऊन हिंदुधर्मांतील म्हणून एकएक स्वतंत्र पंथ निघाले पैकीं पहिला पंथ काढण्याचा मान राजाराममोहनराय यांनाच दिला पाहिजे. कलकत्याच्या राममोहनांच्या निवासांत त्यांनीं आपल्याच घरीं एकदोन मित्र घेऊन वेदमंत्रांनीं प्रार्थना करण्यास सुरवात केली. हळूं हळूं त्यांच्या भोंवती धार्मिक लोकांचे व त्यांच्या मित्रांचे कडें बनूं लागलें. पुढें घरीं प्रार्थना करावयाच्या ऐवजीं एकादे ठिकाणीं मंदिरांतच बसलेले बरें असें वाटून ते ख्रिस्ती चर्चमध्येंच जाऊं लागले. ख्रिस्तीचर्चमध्ये हिंदू प्रार्थना म्हणण्यापेक्षां स्वतःचेंच कां एकादें मदिर असूं नये अशी कल्पना त्यांच्या मित्राने त्यांना दिली. तेव्हां राजा राममोहनानीं रीतसर पंथाची स्थापना केली. × त्याला बाबू द्वारकानाथ टागोर यानी सक्रीय पाठिंबा दिला. वर दिलेल्या माहितीवरून हें सिद्ध होतें कीं, इंग्लिश लोकांच्या प्रार्थना पद्धतीला भुलून त्यांनीं वेदांतील प्रार्थना शोधून काढल्या. ब्राह्मसमाजांतील मूलतत्वें शोधून पाहिलीं तर ख्रिस्ती उपचारांची त्यावर दाट छाया पडलेली आहे असें दिसतें. तत्वज्ञानाच्या आंतील गाभा हिंदू वेदकालीन तत्वज्ञानाचाच आहे. ब्राह्मसमाजाचीं तत्वं राममोहनांनीं सांगितलीं आहेत तीं अशीः—" विश्वाचा नियंता व शास्ता असलेला जो कोणी अनंत अगम्य परमेश्वर, त्याची भक्ति करण्या-

[१] आजकालचा महाराष्ट्र पृ. २२४. × Raja Ram Mohanroy. pp. 25

करितां हा समाज काढला. या समाजांत कोण कोण येऊं शकेल ? तर जो कोणी सार्वजनिक ठिकाणीं जातीभेद, वर्णभेद, गरीब श्रीमंत हा भेद न मानता धार्मिक गभीरतेनें, व शिस्तीने येईल तो पंथाचा सभासद होईल." पूजा पद्धती तर अशी होती कीं " कोणतीही मूर्ती, पुतळा, खोदकाम, चित्रें, रंगकाम यांत असलेली, या प्रार्थना मंदिरात आणता कामा नये. आणि मंदिरांत बळी, देवासाठीं किंवा भक्षणासाठीं कोणचाही घेतला जाणार नाहीं. तसेंच मंदिरांत खाणेपिणे, मजलशी अगर दंगेधोपे करण्यास केव्हांही परवानगी मिळणार नाहीं. आणि अशा तऱ्हेचीं येथे भाषणे, व्याख्याने, व प्रार्थना होतील कीं, त्यायोगे जगांतील सर्व धर्मांची व पंथांची मंडळी एकत्रित आनंदाने बसूं शकतील." [१] ही ब्राह्मसमाजाचीं तत्वें सांगितल्यावर त्यावर-टीका करतांना त्या ग्रंथाचे लेखक म्हणतात, " It shows however, that he had no apathy towards chritianity." वरील तत्वें वाचून किंवा त्याचा अभ्यास करूनसुद्धा ख्रिश्चनधर्माशीं या तत्वांचा कांहींसुद्धां मेळ बसत नाहीं असें म्हणणें धाडसाचें आहे. वाटल्यास असें म्हणतां येईल कीं, हिंदुधर्मांतील ख्रिस्ती तत्वज्ञानाच्या तोंडवळणाचे तत्वज्ञान त्यांनीं आपल्या पंथाकरितां शोधून काढले. एकदरीनें पाहतां ब्राह्म समाजाची स्थापना, धार्मिक बाबतींत मिशनऱ्यानीं टाकलेला पेच सोडविण्यासाठीं झालीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. व त्यायोगे हिंदुधर्मांतील लोक मिशनऱ्यांच्या धर्मांतर करण्याच्या कारवाईपासून निर्भय झाले व एक प्रकारें मिशनरी लोकांना हा पहिला जबरदस्त ठोका मिळाला ! जे गृहस्थ त्यांना वाटले ख्रिश्चन होतील त्यांनींच ख्रिश्चन धर्माची चलती, रोखून धरली.

याचवेळीं महाराष्ट्रांत अशाच प्रकारची धार्मिक लाट सळसळत होती. पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर हे जेव्हां मुंबईस येऊन गेले, त्यावेळीं काहीं शेलक्या लोकांबरोबर त्यांनी चर्चा केली. ह्यावरूनच पुढें दादोबा पांडुरंग आदि मंडळींनी मिळून एक सभा स्थापन केली. तिचें नाव " परमहंस

---

[१] ibid ' 83.

सभा. " ही सभा गुप्त होती....जातिभेदाचे बंधन आपण पाळीत नाहीं हें सिद्ध करण्यासाठीं ख्रिस्ती भटारखान्यात तयार झालेला पावाचा तुकडा खाऊन वर परजातींतल्या माणसाचे हातचे घोटभर पाणी पिण्याचा निर्बंध दर आठवड्याला एकत्र जमून सभासदाना अमलात आणावा लागे.[१] जातीभेद तोडावा हा उद्देश सफळ व्हावा म्हणून कोण ही यातायात ! आणखी एक या सभेची गमत होती ती ही कीं, या सभेत प्रवेश करताना त्याला " तिचे नियम वाचून दाखवल्यावर व त्याने त्यास संमती दिल्यावर तो ( नवीन सभासद ) ओंजळीत पाणी घेऊन खाली सोडी. नंतर एक दुधाचा प्याला आणून प्रथम अध्यक्षाने व दुसऱ्या कित्येकानीं तोडास लावल्यावर त्याला प्यावयास देत ! आणि रोटीचा तुकडा खावयास देत. "[२] मात्र दादोबा पाडुरंगानीं या प्रकरणात कधींही भाग घेतला नाही हे मोठेंच आश्चर्य होय. या सभेचा या उपचारात ख्रिस्ती उपचाराची स्पष्ट झाक दिसते. या परमहस सभेचेच शेपूट का म्हणानात असे दुसरे कित्येक वेगवेगळे विचार समाजात त्या सभेच्या समाप्तीनतर तरगत राहिले होते. ते गोळा करुन त्यांना स्थायी स्वरूप देण्याचें काम कोणीतरी करावयास पाहिजेच होते. ते कार्य एकदाचे होऊन १८५७ मध्ये मुंबईस प्रार्थनासमाज ( एकेश्वरभक्त मंडळी ) या संस्थेची स्थापना झाली. हिच्या आद्य संस्थापकांत न्या. मू. रानडे नव्हते. तरी पुढें रानडे, भाडारकर म्हणजेच समाज असे समीकरण ठरले गेलें. या समाजावर परकी धर्मांचे, मिशनऱ्यांचें, कोणते अस्पष्ट छाप दिसतात ते आपण पाहू. प्रथम त्यांची तत्त्वें कोणतीं होतीं तें पाहू म्हणजे खुलासा करणें बरें पडेल.

" देव एकच आहे...मूर्तिपूजेवर माझा विश्वास नाहीं...कांहीं वाईट कर्म मजकडून झाल्यास प्रायःश्चित म्हणून मी ईश्वराची प्रार्थना करीन... इ. इ. "[३] सर्वांनीं मिळून दर रविवारी प्रार्थना करावयाची, हा दंडक होता व प्रार्थना झाल्यावर " तथास्तु " म्हणावयाचें. अगदीं वरवर पाहाणाराला

---

१ न्या. मू. रानडे—न. र. फाटक पृ. १२४. २ कित्ता पृ. १२७.

३ प्रार्थना समाजाचा इतिहास—द्वा. गो. वैद्य

सुद्धां हें ख्रिस्तानुकरण आहे असें दिसून येईल. रविवारची प्रार्थना—आमेन-ऐवजीं तथास्तु—पश्चात्ताप म्हणून प्रार्थना व मूर्तिपूजेचा नाश या गोष्टी त्यांचें ख्रिस्त्यांशीं साम्य दाखवितात. प्रथम प्रथम तर या समाजाची ख्रिस्तानुयायी म्हणून लोकांनीं टिंगल चालवलेली होती. पण "प्रार्थनासमाज हें एक स्वदेश बांधवांच्या धार्मिक उद्धाराचें साधन आहे"[१] अशी माधवराव रानडे यांची समजूत होती व प्रार्थनासमाजाचे लोक जर नुसत्या गटानें राहिले तर त्यांची एक जात बनून जाईल व त्या समाजाच्या उद्देशांत असलेली व्यापक कार्यक्षमता राहणार नाहीं असें त्यांना वाटे. म्हणून त्यांनीं वेळोवेळीं धार्मिक प्रवचनांतून असें अट्टाहासानें सांगण्यास सुरवात केली कीं, हा आमचा समाज म्हणजे नवीन एक जात नसून आम्ही जुन्या परंपरेला सोडचिठ्ठी दिलेली आहे. भागवत धर्म ज्या तत्वावर उभारलेला आहे त्या तत्वांवर प्रार्थनासमाज उभा राहिलेला आहे असेंही त्यानीं सांगितलें. पण लोकांची समजूत पटली नाहीं. टीकाकार म्हणत "तुमची ती 'रविवारची प्रार्थना'—खुर्च्या व इंग्रजी भाषेंतील निवडक वचनांचा पुनः पुनः उच्चार हीं निदर्शकें कशाचीं आहेत?" याला उत्तर म्हणून म्हणा किंवा दुसऱ्या कोणत्याही कारणानें म्हणा, पण यापुढें प्रार्थनेच्या वेळेला तुकारामाचे अभंग म्हटले जाऊं लागले. भांडारकर हे प्रार्थना समाजाचे अध्वर्यु होते. त्यांना जुन्याचा अभिमान फार. प्रार्थनासमाज ख्रिस्तानुयायी होऊं नये म्हणून केशवचंद्र सेन यांनीं काढलेल्या ख्रिस्तमतप्रदर्शक पंथांत आपला समाज त्यांनीं पुष्कळ लोकांची इच्छा असतानासुद्धा मिसळूं दिला नाहीं. 'आपलें धार्मिक तत्वज्ञान युरोपवर पगडा बसवूं शकत व याचा आपण धिक्कार केला तर त्याचा भयंकर परिणाम होईल व म्हणून इतर हिंदुधर्मीयापासून वेगळा होण्याचा प्रयत्न करणें म्हणजे त्यांत स्वतःच्या नाशाचीं बीजें आहेत असें मला वाटतें'[२] असें डॉ. भांडारकरांनीं सांगितलें आहे. माधवरावांनीं एकेश्वराची धर्मनिष्ठा या निबंधांत प्रार्थना समाजाची तरफदारी भागवत

---

[१] न्या. मू. रानडे चरित्रावरून. [२] भांडारकरांचे पत्र—न्या. मू. रानडे चरित्रावरून.

धर्माची तुलना करून केली आहे. तरीही बहुजन समाज प्रार्थना समाजापासून अलिप्तच राहिला, असें विधान आजची त्या समाजाची स्थिति पाहिली म्हणजे करण्यास हरकत नाहीं. प्रार्थना समाजासारखे धार्मिक उन्नतीचे प्रयोग यापूर्वी महाराष्ट्रात झाले नाहींत असें नाहीं. अगदीं ज्ञानेश्वर काळींसुद्धां श्रीचक्रधरस्वामींनीं जातिनिर्बंध तोडणारा व एकच श्रीकृष्णदेव मानणारा असा "महात्मा पंथ" काढलाच होता. पण चातुर्वर्ण्याला लाथाडल्यानें बहुजनसमाजानें त्या पंथीयांना बहीष्कृत केलें व अजूनपर्यंत तो समाज थोडाबहुत त्या स्थितींत आहे. तितकी परिस्थिति या नवीन समाजाची झाली नाहीं हें खरें आहे पण ख्रिस्ती तत्वांचा व ख्रिस्ती उपचारांचा वास लोकांना लागतांच त्यांनीं या पंथाचें नाव टाकलें. हा समाज तग धरुन कां राहिला नाहीं याची कारण मीमांसा आपल्याला येथें करावयाची नाहीं पण त्याच्या नामशेषत्वाला कारण त्याच्यावर असलेल्या ख्रिश्चन पद्धतीचा छाप होय. या समाजाचें ध्येय नुसतें धार्मिक होतें हा एक अवगुणच होता असें म्हणावयास पाहिजे. समाजाला त्यावेळीं धार्मिक तत्वज्ञानाची जरुरी नव्हती. व्यावहारिक गरजा भागविणारा व त्याला धार्मिक अस्तर जोडणारा असा, एक पंथ दो काज, अशा प्रकारचा पंथ त्याना पचला असता. पण प्रार्थना समाजिष्टांनीं काय व ब्राह्मसमाजीयांनीं काय, धर्मावरच जोर दिला म्हणून ते फार दिवस जोमाने टिकले नाहींत. गुजराथ मधील प्रसिद्ध कार्यकर्ते स्वामी दयानंद सरस्वती यांनीं मात्र स्वतःच्या अविश्रांत व तेजस्वी खटपटीनें वाढवलेला 'आर्यसमाज' टिकून आहे. एवढेंच नव्हे तर त्याची पाळेंमुळें खोल पर्यंत जाऊन त्या पंथानें समाजाच्या धार्मिक व व्यावहारिक या दोन्ही गरजा भागविण्याचें ठरविलें हें होय. या समाजांत व उपरिनिर्दिष्ट दोन समाजांत फार अंतर आहे. धार्मिक म्हणून त्यांनीं वेदांना बुद्धिप्रामाण्यावर स्थान दिलें. मूर्तिपूजा नुसती नाममात्र नष्ट न करतां तिला मूठमाती दिली. जातींजातींतील द्वेष पार काढून टाकला. प्रार्थनेची सक्ती केली नाहीं. सगळ्यांत मुख्य गोष्ट कोणती केली असेल तर ही कीं, "धार्मिक उन्नती बरोबर समाजाची शारीरिक, मानसिक व आर्थिक उन्नती करण्या-

करितां " ही संस्था स्थापन होत आहे असें त्यांनीं सांगितलें. त्या समाजाचें मूळ खिस्ति धर्मातून घेतलेलें नसून जुन्या वेदकालीन धर्मांतून त्याची उत्क्रांती होत असल्यामुळें लोकानीं त्यांना मान दिला. सर्व लोकांचा दर्जा सारखा ठेवला व प्रथमतः समाजाच्या खालच्या थरांतच उपदेशाला व सुधारणेला सुरवात केल्यामुळें तो अजूनपर्यंत चांगला टिकाव धरून आहे.+ 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टम् गुणकर्म विभागशः।' या भगवंताच्या उक्तीवर या समाजानें चातुर्वर्ण्य मानलें. हें एक त्याच्या दूरदर्शीपणाचें गमक आहे. चातुर्वर्ण्य नाशाच्या खडकावर पुष्कळ पंथीयांचीं जहाजें आतांपर्यंत फुटलीं आहेत. महानुभाव पंथ तर चातुर्वर्ण्याचा नाश केला म्हणूनच बुडाला !

आर्य समाजानें हिंदुसमाजाच्या आर्थिक गरजा भागविण्याकरीता शिक्षण देण्याचे त्यांना मदत करण्याचे मार्ग काढले. शाळा, कॉलेजें अनाथालयें व रुग्णालयें काढून खिस्ती मिशनऱ्याप्रमाणें लोकांत मिसळण्याचे काम केलें. असें वरील दोन्ही समाजियांनीं केलें नाहीं. खिस्ती धर्मातील ही व्यावहारीक बाजू त्यानी घेतली. धार्मिक बाबतींत त्या धर्माची सावली त्यांनी आपणांवर पडूं दिली नाहीं. यावरून या समाजानें आपल्यांतील चांगलें व दुसऱ्याकडूनही चांगलें घेऊन योग्य समन्वय साधला. कांहीं लोकांचें म्हणणें असें आहे कीं, 'जन्मतः येणारे चातुर्वर्ण्य आर्यसमाजियांनीं जरी मोडले असले तरी, त्यांच्यावर असलेल्या बऱ्याच दीर्घ कालापासून एकावर अेक सूक्ष्म पण कठीण कवचाप्रमाणें वज्रलेप होऊन बसलेल्या, संस्कारांचीं पुटेंच्या पुटें एकदम टाकीच्या घावानें निखळून पडणें अशक्य आहे....म्हणूनच आर्यसमाजाची तत्वें मूलतः जरी बऱ्याच अंशीं चांगलीं असलीं तरी त्यांचा प्रभाव प्रत्यक्ष व्यवहारांत होणें अथवा तीं सर्वांस मान्य होणें शक्य नाहीं.' [१] याला जर म्हटल्यास उत्तर त्यांच्या वरील अवतरणातच आहे. जर तत्वें चांगलीं व मूलभूत शुद्ध असलीं तरी तीं या भूमींत रुजावयास पाहिजेत.

---

+ आजकालच्या महाराष्ट्रावरून

[१] स्वामी दयानंद सरस्वती--प्रस्तावना--श्री. नी. चाफेकर

कांहीं कट्टया सनातनीशिवाय ही आर्यसमाजीयांची विचारसरणी मान्य होण्या-सारखीच आहे. आर्यसमाजाच्या युक्तायुक्ततेची चर्चा करणेचें हें ठिकाण नव्हे म्हणून आंखडतें घ्यावें लागतें.

थिऑसॉफिकल सोसायटी ही संस्थाही हिंदुस्थानांत काम करीत होती. हिचा उगम परक्या देशांत झाला होता. हिच्या जनकांनीं प्रथम अमेरिकेंत आल्यापासूनच स्वामी दयानंदाशीं नेते म्हणून संबंध ठेवला होता. स्वामी दयानंदानींही आपल्या समाजाबरोबर याही सोसायटीची भरभराट केली पण पुढें ती संस्था अनीश्वरवादी झाली व तिचा आर्यसमाजाशीं संबंध तुटला. या समाजाचे आधारस्तंभ म्याडम् ब्लॅव्हाटास्की व कर्नल आल्काट, यांनीं हिंदुधर्म व त्याच्या शास्त्रांचा अभ्यास केला होता व जुन्या शास्त्रीय ग्रंथापासून नवीन धर्माची स्थापना हिंदुलोकांत करावी असा त्यांचा उद्देश होता. हा समाज मद्रासकडे फार फोंफावला. मिस् ॲनीबेझांट नांवाच्या बाईनीं पुष्कळ दिवस या समाजाची धुरा वाहिली. त्यांनीं राजकारणांत भाग घेतल्यानें अनायासेंच या समाजाला महत्व आले व या समाजाच्या शाखा हिंदुस्थानामध्यें सगळीकडे वाढल्यामुळे कांहीं काल प्रगती झाली पण मुळांतच हा पंथ अनीश्वरवादी होता व नंतर भुताखेतांवर विश्वास ठेवणारा असा झाल्यानें मिस् ॲनिबेझांट बाईच्या मृत्यूनंतर हा पंथ नामशेषच राहिला आहे.

# प्रकरण ८ वें

## श्रद्धेपेक्षां बुद्धिप्रामाण्यावर अधिक भर

मागील प्रकरणांतून वर्णन केल्याप्रमाणें मिशनरी लोकांच्या ख्रिस्ती धर्माच्या प्रेमानें आमच्या समाजसुधारकांच्या मनांत समाजसुधारणेची जी लाट उत्पन्न झाली ती कशीकशी फोफावत गेली हें सांगितलें. धर्म सुधारणेच्या अनुषंगानें समाजांतील किडका भाग काढून टाकण्याचीही तयारी सुधारकांनी दाखविली. पण तिची व्याप्ती इतपतच होती कीं, ज्यांत धर्माचा थोडा ना थोडा तरी संबंध यावा. धार्मिक सुधारणा तरी ज्या केल्या त्या देखील आपल्या धर्मांतील वाईट अंगें छाटून टाकावयास पाहिजेत या बुद्धीनें केल्या नसून पूर्वीच्या शास्त्रांतूनच त्या छाटून टाकण्यास आधार पहात असत. राजा राममोहनराय यानीं मूर्तिपूजा अमान्य आहे असे दाखवण्यास पूर्वीच्या वेदांचा आधार घेतला. [1] स्वामी दयानंदांनीं मूर्तिपूजा, जातीभेद इ. नष्ट करण्यासाठीं काशी निवासी पंडितांशीं कडाक्याचा वादविवाद केला. [2] व न्या. मू. रानडे हे देखील प्रार्थना समाजाची तरफदारी करतांना तो नवीन नसून भागवत धर्माचाच एक भाग आहे असे अट्टाहासानें प्रतिपादूं लागले. [3] या सर्व गोष्टीवरुन हें सिद्ध होतें कीं आमच्या लोकांवर जो

---

[1] Raja Ram Mohan Roy [2] Swami Dayanand--Bawa Arjun Sing [3] न्या. मू. रानडे चरित्र

ग्रंथ-प्रामाण्याचा पगडा बसला होता तो अजून कमी झाला नव्हता. सनातनी लोक तर ग्रंथ प्रामाण्याचे अड्डेच! कदाचित अशा लोकांशींच धर्मसुधारणेचा वाद असल्यानें "कांट्यानें कांटा काढावा" त्याप्रमाणे ग्रंथप्रामाण्य ग्रंथप्रामाण्यानेंच खोडून काढण्याचा प्रयत्न या सुधारकांनीं केला असावा. याचा अतिरेक तर स्वामीदयानंदांच्या बाबतींत असा झाला कीं, श्रीक्षेत्र काशी येथें वादविवाद करीत असतां जेव्हां कोणाही शास्त्र्याला दयानंदांचें म्हणणें शास्त्राधारें खोडतां येईना, तेव्हां त्यांनीं अशी युक्ती केली कीं, एका मळक्याशा कागदावर आपणांस हवें तसें वचन स्वतः लिहून तो जुनाच आधार आहे असें सिद्ध करवलें व त्यायोगानें वादांत श्रीस्वामी दयानंदांचा पराभव झाला![1] अर्थात अशा फुसक्या पराभवानें फसणारे दयानंद नव्हते म्हणून बरें नाहींतर आपला पराभव झाला आतां पुनः नवीन शास्त्राध्ययन करा व ग्रंथप्रामाण्य नवीन हुडकून काढा अशा उद्योगाला ते लागले असते तर त्यांच्याहातून झालें इतकें काम होतें ना? ग्रंथप्रामाण्याचें हें खूळ जसजसा काळ जाऊं लागला तसतसें कमी होत जाऊं लागलें व कालाच्या ओघाबरोबर तस होणें प्राप्तच होतें. ज्यांना ज्याना आमच्या धर्मांतील आंतर सुधारणा करावयाच्या होत्या त्यांना त्यांना या सनातनशास्त्री पंडिताबरोबर भांडावें लागलें. पण ज्यांचें ध्येय परकी मिशनऱ्यांशीं भांडावयाचें होतें त्यांना या ग्रंथाच्या किचकट विषयांत गुरफटण्याचें कांहीं एक कारण नव्हतें. अशांपैकीं विष्णुबुवा ब्रह्मचारी हे एक होते. त्यांना धटाशीं आणावा धट। उद्धटाशीं उद्धट। खटनटाशीं खटनट। या रामदासोक्ती प्रमाणें वागावयाचे होते. त्यांनीं मिशनऱ्यांच्याच नव्हे तर आपल्याही धर्म ग्रंथांची फिकीर केली नाहीं. वेळेस रुचेल तें त्यांनीं बोलण्यास सुरवात केली. थोडक्यांत म्हणजे, आपल्या स्वतःच्या बुद्धीस पटेल असेच सांगण्यास त्यांनीं सुरवात केली. विष्णुबुवांच्या बुद्धीला तितकासा जोर नसल्यानें त्यांनीं मांडलेले विचार लोकांत फैलावले नाहींत, तरी बुद्धीला पटेल तेंच सांगण्याची त्यांची

---

[1] Swami Dayanand

आग्रही–वृत्ति पाहिली म्हणजे महाराष्ट्राची पहिली बुद्धिप्रधान पताका त्यांनींच रोंविली असे म्हणण्यास हरकत नाहीं. × विष्णुबुवांना मात्र आपलें सांगणें "बुद्धीला पटलें म्हणूनच सांगितलें" असें होते असें म्हणतां आलें नाहीं. त्यांनीं ईश्वरीसाक्षात्काराच्या भूलथापेखालीं याचें समर्थन केलें आहे. विष्णुबुवाच्या आधीं लोकहितवादींनीं ग्रंथप्रामाण्य न पाहतां आपल्या नुसत्या अनुभवाच्या जोरावर मोठमोठीं विधानें केलीं. तीं त्यांच्या बुद्धिप्रामाण्याला साक्षी आहेत असे म्हणवत नाहीं. ते जर बुद्धिप्रामाण्यवादी असते तर त्यांनीं तसें छातीठोकपणे कबूल केलें असते पण आंतून त्यांच्या मनावर सतानत धर्माचाच पगडा होता ! बंगाल्यांतील सुधारक ईश्वरचंद्र हे जरी समाजांतील दुष्ट-रूढींच्या विरुद्ध लढण्यास एका पायावर तयार असत तरी चांगली रूढी समाजावर लादण्यास तेही शास्त्रार्थच पाहात होते असें दिसतें. महात्मा जोतीराव फुले यानीही आपल्या बुद्धीवरच जास्त जोर दिला होता, पण त्यांचे तत्वज्ञान मूलगामी असल्याने व त्याला अशास्त्रीयतेचा वास येत असल्यानें तें पहिल्या प्रतीचें ठरलें नाहीं. खरे खुरे बुद्धि प्रामाण्यवादी म्हणजे प्रिन्सिपॉल गोपाळ गणेश आगरकर. त्यानीं मात्र प्रखर बुद्धिवादाचें अस्त्र हिन्दीलोकाच्या ...त्यांतल्या त्यात महाराष्ट्रीयांच्या हातात दिलें होतें. कोणत्याही गोष्टीची सुधारणा करावयाची असल्यास तिच्या घटकांशींच जमवून घेऊन सुधारणा करावयाची अशी ही पद्धती नव्हे. तर बुद्धीला पटेल तो विचार अमलांत आणावयाचा मग त्या विचाराने मूळ सुधारणा ज्या गोष्टींची करावयाची त्या गोष्टींत आमूलाग्र अंतर्बाह्य फरक झाला तरी चालेल. अशा या पद्धतीच्या प्रखर भट्टींत भाजून निघालेल्या सुधारणा सर्व ठिकाणाच्या असतात अशी आगरकरांची प्रामाणिक समजूत होती. पण हिंदू लोकांची वृत्ति किंवा सगळीकडीलच म्हणा, अशिक्षित व दुर्जन समाजाची वृत्ति ही जुन्या गोष्टीना चिकटून राहण्याचीच असते. तिच्यावर या बुद्धीवाद्यांनीं चाल केली

× विष्णुबुवांची "सुखदायक प्रकरणी निबंध" व "वेदात्मधर्मप्रकाश" ही दोन पुस्तकें वाचली असतां या म्हणण्याचा प्रत्यय येतो.

तर तें त्यांना कधींही रुचावयाचें नाही. आगरकरानाहीं त्याचा अनुभव आला. त्यांच्या हयातींतच नव्हे तर त्यांच्या मागूनही आगरकरांना त्यांचे हक्काचे स्थान जनमतांत मिळालें नाहीं. श्रद्धेचें साम्राज्य संपून बुद्धीचें साम्राज्य सुरुं झालें. महाराष्ट्र जसा बुद्धिप्रधान आहे तसा बंगाल नाहीं. त्यातील लोकांच्या भावनाविवश स्वभावामुळे एकाद्या प्रसंगानें ते वहावूनही जातात. गुजराथ प्रांताचें मात्र या दोघापेक्षाही थोडेसे भिन्न धोरण आहे. त्याच्या ठिकाणीं अमूम श्रद्धावृत्ति आहे. श्रद्धेनें मोठमोठीं कार्यें झालेलीं आहेत. शिवरामपंत परांजपे यांनीं म्हटलें आहे कीं "श्रद्धा हे सहावे इद्रिय आहे." [१] आपण पांच कर्म व ज्ञानेंद्रियानीं जगाचा कानोसा घेतो पण श्रद्धा ही जगाच्या पलिकडील अतींद्रिय जगही अवलोकूं शकते. असें जरी खरें असलें तरी, श्रद्धेनें सत्य व असत्य यामधील विभाज्य रेषा लवकर ओळखतां येत नाहींत. त्या ओळखतां येण्यास "तपश्चर्या" संग्रहीं असावी लागते व या श्रद्धेचा आशय अथवा "आंतला आवाज" फक्त काहीं महाभागांना येत असतो. हिंदू धर्मांतील बहुजन समाजही असाच जुन्या शास्त्रवचनावर सश्रद्ध आहे. या श्रद्धेची मर्यादा पुष्कळ अतिरेकी होऊन विकृत आचारांचो रास हिंदूमात्रांच्या पुढें पडली. तिलाच कालेंकरुन रूढीनें बळकटी आली. अ । या रुढीने बांधलेल्या हिंदुधर्मीयांस मोकळे करण्यास दोन प्रकारच्या सुधारकांनीं वेगवेगळे मार्ग पत्कारले. पहिल्यापक्षाने कमी त्रासाचा, समाजाला न पचणारा असा आंतसुधारणांचा मार्ग चोखाळला, तर दुसऱ्यानें श्रद्धेला झुगारुन देऊन बुद्धीला प्रामुख्य देऊन धर्माच्या काय किंवा समाजाच्या काय जितक्या जितक्या कुजक्या बाजू दिसल्या तितक्या कापून काढण्यास सुरवात केली. [ त्या सुधारणेला मग आंतर्सुधारणा म्हणा अगर बाह्य—सुधारणा म्हणा. ] आतां या बुद्धिप्रामाण्याच्या आगमनाच्या कारणपरंपरेची थोडीशी चर्चा करूं.

ग्रंथप्रामाण्य जाऊन बुद्धिप्रामाण्य येण्यास किंवा श्रद्धेची जागा बुद्धिनें पटकावण्यास युरोपियन वाङमयाचाच उपयो। झाला. इंग्रजीराज्यापासून

[१] साहित्यसंग्रह भाग १—य. गो. जोशी प्रकाशन

आणखी एक असा फायदा आमच्या राष्टास झाला कीं त्याची दृष्टी उदार झाली. आमच्या खांद्यावरून पलीकडे काय आहे हें पाहण्याची वृत्ति आमच्यांत उत्पन्न झाली हें एक चांगलें झालें.

प्रथमतः इंग्रजीच्या पहिल्या काळांत एतद्देशियांस कोणतें शिक्षण द्यावें असा विचार चालला असतां "इकडच्या लोकांस इकडचें शिक्षण" असें म्हणणारा युरोपियनांचा एक वर्ग होता. आमच्या इकडील त्यावेळचे शहाणे, म्हणजे शास्त्रीपंडित काय सांगतील हें सांगण्याची जरुरीच नव्हती. कां कीं; जुन्या संस्कृत ग्रंथाशिवाय त्याना दिसत तरी काय होतें? पण त्याही वेळीं मेकॉलेसारख्या लोकानीं हिंदुस्थानास निव्वळ सुधारण्याच्याच इच्छेनें पाश्चात्य ज्ञान द्यावें असें प्रतिपादिलें. राजा राममोहनराय हे त्यावेळीं समाज सुधारक म्हणून चमकूं लागले होते. त्यांनीं या वादात भाग घेतला. व 'अज्ञान चिरंतन ठेवणारी' अशी जुनी संस्कृत विद्या शिकवूं नये असा हट्ट धरला. व "ज्याअर्थीं हिंदी लोकांची सुधारणा व्हावी, असा सरकारचा उद्देश आहे, त्याअर्थीं अधिक उदार व सुधारलेल्या शिक्षणपद्धतीचाच अवलंब त्यानें केला पाहिजे. यांत गणित, भौतिकविद्या, रसायनशास्त्र, शारीरशास्त्र व इतर 'उपयुक्त' शास्त्रें यांचा समावेश असावा"[१] असें स्पष्ट सांगितलें. अर्थात असें शिक्षण द्यावयाला आपल्याकडील लोक कितपत उपयोगी पडणार? तेव्हां, "हें शिक्षण देण्यासाठीं युरोपात शिक्षण घेतलेल्या व बुद्धिमान् लोकांची नेमणूक...करावी आणि या कार्यीं एक कॉलेज काढून तेथें अवश्यक ले ग्रंथ, उपकरणें व इतर ज्ञानसाधनें ठेवावींत"[१] अशी सूचनाही मांडली. राजा राममोहनांच्या सूचनेचा उपयोग होऊनच इंग्रजांनीं पाश्चात्य शिक्षण हिंदी प्रजेला द्यावयाचें ठरलें असेंच कांहीं नाहीं, पण ज्या घटनेनें हें शिक्षण येथील जनतेस देण्याचें ठरवलें ती घटनाच हिंदुस्थानाच्या दृष्टीनें क्रांतीकारक ठरते यांत संशय नाहीं. जर जुनेंच ज्ञान आपण घोकीत बसलों असतों तर जगाच्या या बाजारांत व्यावहारिक दृष्ट्या आपली किंमत कुच-

---

[१] राजा राममोहनांचें लॉर्ड ॲमहर्स्टला पत्र—अर्वाचीन भारतावरून पु. ७६

कामी ठरली असती. कारण " आम्ही जितक्या लवकर ... संसारांतून मुक्त होऊं तितकें उत्तम, अशासारख्या वेदांतांतील सिद्धांतांच्या शिक्षणापासूनही तज्ञांना समाजाचे घटक कसें बनावें याचें शिक्षण मिळणें शक्य नाहीं. [1] व नव्हतेंही. पाश्चात्य शिक्षणाला चिपळोणकरांनीं 'वाघिणीचें दूध' म्हटलें आहे तें अगदीं यथार्थ आहे. अव्वल इंग्रजींत इंग्रजी शिक्षणानें नौकरी मिळते. मानमरातब होतो म्हणूनच कारकुनी शिक्षण घेणारे पुष्कळ लोक निघाले. इंग्रज सरकारच्या शिक्षणांतील 'Filter Theory.' 'फिल्टर थियरी' प्रमाणें समाजाच्या खालच्या थरापर्यंत, शिक्षण, प्रथम शिक्षितांनी पोचवा. बयाचें तें तसेंच राहून अल्प शिक्षणाचें बहुमोल फळ एकस्यानेंच चोखाळण्याची जणूं चढाओढ चालली होती. इंग्रजांना तरी कुठें खरें शिक्षण द्यावयाचें होतें; 'कारकुनांचे कारखाने' याशिवाय तरी शाळांना फारशी किंमत नव्हती ! शाळांच्या चाकोरींतून उच्च विश्वविद्यालयीन शिक्षण घेण्यास जेव्हां आमच्यातील लोक पुढे येऊं लागले तेव्हां मात्र त्यांचा युरोपिय उच्च वाङ्मयाशीं परिचय झाला. 'वाघिणीचें दूध' तरी तें हेंच आध्यात्मिकांपेक्षां भौतिक ज्ञानानें किती आघाडी मारलेली आहे हें त्यावेळीं लोंकांना कळून चुकलें."

'पदवीधरांचे मुकुटमणी' न्या. मू. रानडे यांची नुसती वाचलेल्या पुस्तकांची यादीच पाहिली तर विद्यार्थ्यांच्या डोळ्याखालून व जिज्ञासु विद्यार्थ्यांच्या वाचनांतून कशाप्रकारचे ग्रंथ जात होते हे दिसेल *. हिंदुस्थानांत हें नवयुग सुरू झालें. विद्येचें पुनरुज्जीवन झालें असें म्हणावयास हरकत नाहीं. मिल्ल, स्पेन्सर, हक्सले सारख्या समाजधुरीणांचे ग्रंथ वाचनांत येऊं लागले. निरनिराळ्या विचार प्रवाहाचीं माणसें व त्यांच्या बरोबर त्यांची मनें निदर्शनांत येऊं लागलीं. समाज सुधाकांच्या पहिल्या पिढीला हे विचार स्वतःला जरी पचवितां आले तरी ते जसेच्या तसे जनतेच्या गळीं उतरविण्याचें धाडस झालें नाहीं. पण पुढल्या पिढीनें हें काम केलें. स्वामी विवेकानंद, प्रिन्सिपॉल आगरकर हे या दुसऱ्या पिढींतील विद्वान् होत. स्वामी दयानंदांनींसुद्धां

[1] किता पृष्ठ ७६ * पहा—रानडे चरित्र—न. र. फाटक परीशिष्टयादी

पुष्कळ वेळां श्रद्धेपेक्षां बुद्धीवरच धर्मकृत्यें घासून स्वच्छ केलीं. मागच्या प्रकरणांत अन्त्येष्टीबद्दल [1] त्यांचे विचार दिलेलेच आहेत.

धर्म ही सार्वजनिक भावना. त्यांत असणारे दोष बुद्धिला दिसले. ते तर झाडून टाकलेच, पण बुद्धीच्या टप्यांत आलेलीं वैयक्तिक क्षुद्र वाटणारीं दुःखें हीं धसास लागलीं. त्यांचा नाश करणेंही प्राप्त झालें. तें समाज सुधारकांनीं केलें. स्वामी विवेकानंदांच्या चरित्रांत असा एक प्रसंग दिला आहे. एक गोसेवक धर्माच्या नांवाखालीं भिक्षा मागत होता. त्याला डावलून त्यांनीं प्रथम एका आपद्ग्रस्तास मदत करण्याचें ठरवले. तेव्हां आश्चर्यचकीत होऊन तो गोरक्षक म्हणाला कीं, विवेकानंदांनीं धार्मिक कार्य आधीं करावयास पाहिजे, कां कीं धर्मशास्त्रांत गाईला "माता" म्हटलें आहे. तेव्हां यावर विवेकानंद म्हणाले "मी गाई, बैल वगैरे पशूंना धर्माच्या आज्ञा म्हणून मान देणार नाहीं. प्रथम माणसाचें सुख पाहीन!" [2] अशा रितीनें बुद्धीला पटणारें धिटावून सांगण्याइतकें धाडस सुधारकांच्या अंगांत बाणवूं लागलें, हा सगळा परिणाम इंग्रजी शिक्षण व वाङ्मयादि वाचन यांचा यांत संशय नाहीं. आगरकर हे पहिले प्रतीचे बुद्धिप्रामाण्यवादी व्यक्तींच्या सुखाकरतां झटणारे झाले. त्याचें कारणही हें पाश्चात्य वाङ्मयाचें वाचनच होय. व्यक्तींच्या सुखाकरतां समाजाचीं बंधनें ढिलीं झालीं तरी चालतील पण व्यक्ति दुखवतां कामा नये अशी त्यांची विचारसरणी होती. तेव्हां व्यक्तिसुखार्थ बारिकसारिक गोष्टींतही लक्ष घालून लहानसहान वाटणारीं रुढीनें आलेलीं दुःखें ते नाहींशी करण्याचा प्रयत्न करीत. हजामतीसारखी जरुरीची साधी गोष्ट, पण ती व्यक्तिसुखाच्या आड येते, असें पाहिल्यावर त्यांनी तिची मीमांसा केली. "तूर्त ज्या गोष्टींत लवकर सुधारणा व्हावयास पाहिजे आहेत त्यापैकीं हजामतही एक होय. कांहीं गोष्टी दिसण्यांत फार क्षुल्लक वाटतात पण मनुष्याच्या सुखदुःखाशीं त्यांचा पुष्कळच संबध असतो." [3] अशी प्रस्तावना करून त्यांनी घरांत ओलीं लांकडें पेटविलीं असतां जो धूर निघतो त्यानें घरांत जो अनर्थ घडतो त्याचें सविस्तर वर्णन

---

[1] पहा—प्रकरण ५वें. [2] पहा—स्वामी विवेकानंदांचें चारित्र भाग.

[3] पहा—आगरकरांचा निबंधसंग्रह भाग ३ रा निबंध पहिला.

केलें आहे. हजामतीसंबंधीं बारीक वर्णन केलें हें पाहावयाचें असल्यास 'हजाम व हजामती' हें प्रकरण अवश्य वाचावयास पाहिजे. पोषाखाच्या बाबतींत देखील अशीच चौकस दृष्टी होती. बायकांच्या अवजड पोषाखाबद्दल त्यांनीं केलेली चर्चा व सुधारणा तर अजूनही या काळांत लोकांना अत्यंत क्रांतिकारक वाटतात.

अशाप्रकारें पाश्चात्य विद्येच्या वाचनानें आमच्या इकडील कांहीं लोकांस बुद्धिवादाच्या जोरावर वाईट तें खोडून काढण्याची बुद्धी झाली तर चिपळूणकरांच्यासारख्या सुधारकांस पाश्चात्याचे तें सारें वाईट दिसूं लागलें! हा कदाचित अति सुधारणेचा प्रतिकार असेल पण चिपळुणकरांच्या या सुधारणा विरोधानें एक गोष्ट मोठी चांगली झाली ती ही कीं, त्यांनीं समाजसुधारणेच्या मागें लागलेल्या लोकांस फिरवून राजकारणाकडे ढकललें. सामाजिक सुधाणा राजकीय सुधारणेशिवाय फोल आहेत असें सांगण्याकरतां त्यांनीं टीकेचें अमोघ शस्त्र उचललें. क्वचित् प्रसंगीं या टीकास्त्राची धार फार तिखटशी भासली पण परिणामीं एकंदर समाजाच्या दृष्टीनें ती परिणामी ठरली. चिपळूणकरांचे शिष्य राजकारणवादी निपजले व त्यांनीं देश हालवून सोडला. फक्त आगरकर यांनीं मात्र राजकीय व सामाजिक व धार्मिक या तिरंगी सुधारणेचें शिंग फुंकलें. पाश्चात्य इतिहासवाचनानें चिपळूणकराचें देशस्थितीविषयीं व त्याच्या भवितव्याविषयीं ठाम मत झालें होतें कीं देशाला जर उन्नतीचे दिवस पहावयाचे असले तर ह्या देशांतील जनतेच्या रूढ कल्पनांची टवाळी करून वा त्यांना धाब्यावर बसवून त्याचें कल्याण करता येणार नाहीं, तर त्यांना त्यांच्या राजकीय हक्कांची जाणीव करून दिली पाहिजे. यापुढे मात्र त्यांच्या या विचारसरणीला लो. टिळकांनीं उचलून धरलें व राजकीय कां सामाजिक वादाला मूठमाती देऊन आधीं 'राजकीय' असें केलें. लो. टिळकांच्या नंतर त्याच्याही पुढे ही विचारसरणी जाऊन राजकीय पेंचप्रसंग, आर्थिक सुधारणेवरच अधिष्ठित झाला आहे. तस्मात् "आर्थिक सुधारणा वेशीवर टांगा" असा हट्टाग्रह सध्यां सुरू आहे. त्याची मीमांसा अग्रकाळ येईलच.

# प्रकरण ९ वें

## कुटुंबांकुटुंबांतील दुःखें धसास लागलीं : विवाहविषयक घडामोडी व रुढींचा सक्रीय व सोदाहरण नाश.

पाश्चात्य विद्येच्या प्रसारामुळें इकडील लोकांत नवयुग सुरू झालें व श्रद्धेचा मार्ग बुद्धीनें पटकाविला हें मागच्या प्रकरणांत वर्णिलें. आतां या प्रकरणांत कौटुंबिक दुःखाचा नाश करण्याची प्रवृत्ति कशी निर्माण झाली "तिनें कोणतें कार्य केलें तें पहावयाचें" आहे. राजा रममोहनरायांच्या काळापासून हें श्रद्धयुग ढांसळण्यास सुरवात झाली. त्यावेळीं बुद्धिविकास वादाचें स्वरूप बीजरूपानें वसत होते. तेंच वाढत वाढत जाऊन आगरकर टिळक यांच्या काळीं त्याला स्थिर रूप आलें. याला कारण जसजसें इंग्रजी शिक्षण वाढत चाललें तसतशी माणसांची दृष्टी उदार होत चालली हें होय. हें इंग्रजी शिक्षण सरकारांतून जितकें मिळेल तितकें घेऊन तेथील लोकांची भूक भागेना. तेव्हां त्यांनी स्वतःच हें शिक्षणाचे शास्त्र हातात घेतलें. प्रथम सुशिक्षितानीं, त्यांतल्या त्यात समाज सुधारकांनीं स्वप्रयत्नांवर शाळा काढून लोकांना 'वाघिणीचें दूध' पाजण्याचें ठरवलें याचें कारण तरी, पाश्चात्य वाङ्मय हें आपल्या लोकाच्या विचार पोषणार्थ अन्नाप्रमाणें होईल या आशेनेंच! कुटुंबांतील पुरुषमंडळी शहाणी झाली तरी स्त्रियांचे दुःखाकडे, त्यांना शिकवून शहाणें करण्याकडे, त्यांचें लक्ष जाईनाच. "स्त्रिया आणि शिक्षण"

या दोन कल्पनाच त्यांना विसंगत वाटूं लागल्या. चांगल्या पांढरपेशा समाजांत जर अशी परिस्थिती त्यावेळीं होती तर बहुजन समाजाच्या मनांत काय वसत असेल याची कल्पना करावी. स्त्रियांना शिक्षण देतांना त्यांना अज्ञानी म्हणणें म्हणजे तोंड दाबून बुक्याचा मार अशी परिस्थिती आहे असें राजाराममोहनरायांनीं स्पष्ट सांगितलें होतें [१]. पण असें सांगतांना आपल्या बुद्धिला पटल्यानेंच त्यांनीं हें मत स्पष्ट केलें असें म्हणण्याचें धाष्टर्य त्यांनीं केलें नाहीं तर या गोष्टीस लगेच त्यांनीं ग्रंथप्रामाण्यही दाखल केलें आहे. ते म्हणतात "Some of the women of ancient times received a liberal education and they proved themselves ornaments to the sex." [१] इतकें म्हणण्या पलीकडे त्यांनीं स्त्रीशिक्षणाबाबत जास्त केलें नाहीं. स्त्रियांच्या इतर दुःखाशीं ते समरस होत. (His heart throbbed to see the sufferings of women.) इतरही त्यांनीं बारीकसारीक चळवळी स्त्रियांबाबत केल्या पण त्यांचें लक्ष समाजाच्या दुःखाकडे लागलें असल्यानें व धार्मिक कार्यांत सुधारणा करण्याकडे त्यांचा वेळ अधिक गेल्यानें कदाचित् इकडे त्यांचे लक्ष लागलें नसेल. पण पुढें स्त्री शिक्षणाची व स्त्रियांचेवर होणाऱ्या इतर जुलुमाच्या निवारणार्थ जी मोठमोठ्या सुधारकांत लाट निघाली तिचें बीज मागें मागें गेल्यानें राजा राममोहनापर्यंत सांपडतें ! स्त्री शिक्षणाचे खरे व पहिले पुरस्कर्ते बंगाल्यांतील ईश्वरचंद्र विद्यासागरच होत. बंगाल सरकारच्या कार्यकारी मंडळांतील एक सभासद—बेथून नांवाचे एक गृहस्थ होते. त्यांनींच प्रथम स्त्रीशिक्षणाचा पाया हिंदुस्थानांत भक्कम रीतीनें घातला. ईश्वरचंद्र विद्यासागर व बेथून यांनीं "कांहीं सुशिक्षित एतद्देशीयांच्या मदतीनें व साहाय्यानें एक मुलींसाठीं विद्यालय काढिलें." [२] या विद्यालयाकरतां विद्यासागरांनीं अतिशय खटपट करून त्याला स्थैर्य आणलें. नुसतें स्त्रियांना विद्या देऊन सुशिक्षित करावें या मताचेच विद्यासागर नसून स्त्रियांनीं शिक्षणाच्या बाबतींत स्वयंपूर्ण असावें या उद्देशानें त्यांनीं मिस् कार्पेंटर नांवाच्या स्त्रीशिक्षणाभिमानी

---

[१] पहा:—Raja Ram Mohan Roy—pp. 31

[२] ईश्वरचंद्र विद्यासागर—पां. स. साने

अमेरिकन बाईच्या साह्यानें शिक्षकिणी तयार करण्याकरितां एक नॉर्मल स्कूल काढिलें. या नॉर्मल स्कूलचा उद्देश, गरीब घराण्यांतील विधवांस शिकवून, प्राथमिक शिक्षणाचा प्रसार करण्यास त्यांस खेड्यांतून पाठविणें असा होता. परंतु त्यावेळची एकंदर परिस्थिती पाहतां स्त्रिया एकट्या दुकट्या खेडेगांवास जाण्यास तयार होतील असें त्यांचें त्यांनाच वाटेना. शेवटी नॉर्मल स्कूल तर तयार झालें पण एक दोन वर्षांतच त्याची इतिश्री झाली. सन १८५४ मध्यें एतद्देशीयांच्या शिक्षणाकरितां कंपनीसरकारनें कांहीं लाख रुपये मंजूर केले होते. ते खर्च करण्याचा अधिकार विद्यासागरांना दिलेला होता. त्यांनीं ताबडतोब मुलींच्या ५० शाळा स्थापन केल्या. या शाळांचा खर्च पुढें सरकाराच्या विचारांत बदल झाल्यानें बंद करण्यांत आला. तरी डगमगून न जातां त्यांनीं लोकांच्या व स्वतःच्या खर्चानें त्या शाळा तशाच चालविल्या.

महाराष्ट्रांत देखील स्त्रीशिक्षणाचे कैवारी दादाभाई नौरोजी, लोकहितवादी जोतीराव फुले, इत्यादि आपल्या परीनें खटपट करीतच होते. १८४७ सालीं मुंबईस मुलींच्या शिक्षणाकरितां पहिली मुलींची शाळा स्थापन करण्यात आली. तिला मुंबईचे प्रख्यांत नगरशेट नाना शंकर यांनीं पाठींबा दिला. [१] या शाळेंत मोठमोठे समाजसुधारक शिक्षकांचे काम करीत. हिंदी राजकारणाचे जनक असे ज्यांना म्हणतां येईल त्या दादाभाई नौरोजींनी 'Students' Literary and Scientific Society' नांवाची एक संस्था स्थापिली व एका घराच्या ओसरीवर मुलींची शाळा सुरू केली. प्रथम प्रथम "दादाभाई प्रत्येकाला विनवून सांगत कीं प्रयोगादाखल तरी स्त्रीशिक्षणाला तुम्ही प्रोत्साहन द्या. स्त्री शिक्षणापासून फायदाच होईल. तोटा कांहीच होणार नाहीं." [२] अशा विनंत्या अर्जांनीं दादाभाईनीं लोकांचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. त्यानंतर फार नेटाचा व जोराचा प्रयत्न करणाऱ्यांत जोतीराव फुले यांचा समावेश होतो. त्यांनीं, '१८५१ त आपल्या अनेक ब्राह्मण

---

[१] न्या. मू. रानडे चरित्र—न. र. फाटक पृ. १८०. [२] दादाभाई नौरोजी चरित्र—ना. सी. फडके पृ. २०.

मित्रांच्या साह्यानें चिपळूणकरांच्या वाड्यांत मुलींची शाळा स्थापन केली.'[१] या शाळेंत जोतीबांच्या सुशील पत्नी सुशिलाबाई याही त्यांना शिकविण्याच्या बाबतींत मदत करीत. पण रुढीनें बांधलेल्या व अज्ञानांत गुरफटलेल्या अहं-मन्य शिष्टांनीं त्यांना जातां येतां खडे मारिले. तरी जोतिबांनी आपलें काम सोडिलें नाहीं. यानंतरचे स्त्रीशिक्षणाचे मोठे कैवारी म्हणजे कै. गोपाळ गणेश आगरकर होत. आगरकरांनीं ज्या पद्धतीनें व ज्या विषयांचें परिशीलन करण्याचें सांगितलें तोच मार्ग पुढें महर्षी कर्वे यांनीं स्वीकारून स्त्रियांकरितां एक स्वतंत्र विद्यापीठच काढलें. नुसत्या स्त्रिशिक्षणानें स्त्रियांच्या दुःखाचा परिहार होईल असें न वाटल्यानें इतरही दुःखांचा विचार समाजसुधारकांच्या मनांत घोळत होता. वयाच्या तेराव्या वर्षीं ईश्वरचंद्र विद्यासागर स्त्रियांच्या दुःखाविषयीं तळमळ होते. त्यांचे एक वाचस्पती नांवाचें गुरुजी असत. त्यांनीं वयाच्या ८० व्या वर्षीं लग्न करण्याचें मनांत आणलें, व हा विचार विद्यासागरांना कळवला, तेव्हां विद्यासागरानीं त्यांचा कडक शब्दांनीं निषेध केला व "आपल्याशीं असलेला माझा सबंध मी तोडून टाकीन" अशी धमकी दिली. पण शेवटीं त्या वाचस्पतींनीं लग्न करावयाचें तें केलेंच! पुढें या गुरुजीनी कांहीं वर्षांनीं विद्यासागरांचें मन वळवून त्यांना आपल्या घरीं नेलें. उद्देश हा होता कीं विद्यासागरानीं आपल्या बायकोला पहावें. विद्यासागरांनीं त्या स्त्रीच्या मुखाकडे पाहिलें मात्र, त्यांना रडूं कोसळलें व रागानें लाल झालेले विद्यासागर त्या घरांतून बाहेर पडतांना म्हणाले कीं, "या घरांत मी पाण्याचा थेंब पिणार नाहीं." [२] विद्यासागरांच्या ठिकाणीं हें जें सुधारणा प्रेम होतें तें तसेच वाढीस लागलें. विधवाविवाहाविषयीं नीट विचार करतां यावा म्हणून विद्यासागरानीं धार्मिक ग्रंथाचा सूक्ष्म विचार केला व एक दिवस त्यांना पाराशर स्मृतींतील दोन श्लोकांचा नवीनच अर्थ उमगला. शास्त्री-मंडळींना हा आधार दाखववायास हे श्लोक बरें मिळाले या समजुतीनें त्यांनीं

---

[१] महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी—गं. बा. सरदार पृ. १३९.

[२] ईश्वरचंद्र विद्यासागर —पां. स. साने कृत पृ. ७३

शास्त्रीपंडिताशीं वादविवाद केला. व स्वतः विधवाविवाह मंडनपर दोन ग्रंथ लिहिले. त्याने फार खळबळ उडाली ! नुसत्या शास्त्रीपंडितांशीं वाद केल्यानें विधवाविवाहाला मान्यता मिळणार नाहीं तर राजसत्तेचें, कायद्याचें त्याला पाठबळ पाहिजे. हे विद्यासागरांना, ते सुशिक्षित असल्यानें, माहीत झालें होतें. लोक, रूढीपेक्षा कायदा मानतात. म्हणजे धर्म–स्तोम थांबविण्यासाठीं कधीं रूढीच्या जुलुमापेक्षां कांहीं कायद्याचे राजकीय बंधनही त्यांना मागून घेणें भाग पडले. हें त्यांनीं इतिहास वाचून ठरवलें होतें. व म्हणूनच कायद्याची त्यांनीं कांस धरिली.

त्यांनीं २५००० सह्यांचा अर्ज सरकारकडे पाठविला ! सनदशीररित्या चळवळ करण्याचे श्रेय विद्यासागरांना मिळालेंही व १८५६ सालीं विधवा-विवाहाचा कायदा सरकारनें पास केला. या कायद्यानंतर विद्यासागरांनीं एक विधवाविवाह घडवून आणला. या विवाहितांवर बहिष्काराची तरवार लटकती ठेवण्यांत येत असे. त्यापासूनही त्यांचें रक्षण करणे प्राप्त होतें. त्यांनीं ‘ विधवा-पुनर्विवाहनिधी ’ स्थापन केला. नाना खटपटी करून त्यानी समाजांत विधवा-विवाह व पुनर्विवाह रुजविण्याचें यश संपादन केले. त्यांचा विधवाविवाहा-विषयीं इतका आपलेपणा असे कीं ते म्हणत, “ मी मरून जावें व माझ्या पत्नीनें विधवाविवाह करावा. ” [1] या त्यांच्या तळमळीचा परिणाम फार दूर झाला. मध्यें एकदां ते पुण्यांत आले होते. त्यांचीं पुस्तकेंही लोक वाचीत, त्यावरून महाराष्ट्रातील अति उत्तम कार्य केलें गेलें. विष्णुशास्त्री पंडित यांना स्फूर्ती मिळाली. त्यांनीं ‘ विधवाविवाह मंडळ ’ स्थापन केलें. या मंडळाचे पहिले अध्यक्ष जमखंडीकर होते. व उपाध्यक्ष श्री. विंचूरकर होते. महादेव गोविंद रानडे हेही त्या मंडळींत होते. × या सर्वांनी मिळून महाराष्ट्रांत एक पुनर्विवाह घडवून आणला. पण या विवाहप्रकरणीं बहिष्काराचें मोठेंच प्रकरण निघून महाराष्ट्रांत मोठीच धामधूम झाली. शंकराचार्यांच्या संमतीनें विधवा-विवाह सशास्त्र कीं अशास्त्र याविषयीं कडाक्याचा वाद होऊन दोन मतांनीं

---

[1] ईश्वरचंद्र विद्यासागर पृ. २ × रानडे चरित्रावरून

विधवाविवाह मंडळाचा पराभव झाला. मग ज्यांनी विधवाविवाहांत भाग घेतला होता त्यांच्यावरील बहिष्कार प्रायश्चित्तांना जोर चढला. जे अर्धे-कच्चे होते ते नमले. न्या. मू. रानडे देखील प्रायश्चित्त घेऊन मोकळे झाले. पण विष्णुशास्त्री नमले नाहींत. पण उलट त्यांनीं १८७४ त प्रथम पत्नी वारली असतांना 'बोले तैसा चाले' या न्यायानें दुसरा विवाह विधवेशींच लावला. न्या. मू. रानडे याना मात्र तशी विधवाविवाहाची संधी आली असतांना त्यांनी कच खाल्ली हें त्यांच्या सारख्या महापुरुषाला खरोखर दूषणास्पद आहे ! याप्रमाणें हीच चळवळ महाराष्ट्रांत जोम धरीत होती. तिला पाठवणारे महात्मे प्रथम प्रथम पुष्कळ भेटले पण पुढें ही चळवळ चालावी तशी चालली नाहीं. अजून देखील हिला स्थायी स्वरूप आलें नाहीं. रूढीनें बांधले गेलेल्या लोकांना प्रथम उमगलें नाहीं हेंच खरें. ईश्वरचंद्र विद्यासागर एके ठिकाणीं रूढीबद्दल बोलतांना म्हणतात, "हे रूढी देवते, तुझी धन्य आहे ! तूं आपल्या भक्तास पूर्णपणें वश करुन ठेवले आहेस; या लोकाचीं जीवनें सर्वस्वी तुझ्या हातांत आहेत. दास्याच्या जडशृंखलांनीं तूं त्याना आपले कायमचे गुलाम करुन टाकले आहेस. तूं धन्य आहेस !"[१] विधवाविवाह सशास्त्र मानावा म्हणून श्रीस्वामी दयानंदांनीं दुसरीच तोड काढली. बालपणीं लग्न झालेल्या मुली विधवा झाल्या म्हणजे त्यांना पापपंकांत ओढणारे पुष्कळ समाज कंटक असतात ! बालहत्या ही जर वाईट वाटत असेल तर त्याला उपाय बाल-विवाह बंद करुन विधवाविवाह करणें हाच उत्तम उपाय असे सर्वांना वाटत असे. विधवांची कुचंबलेली स्थिति पाहून निदान कायद्याच्या कचाट्यांत सांपडून त्यांची स्थिती असाहाय्य होऊं नये म्हणून अनाथ अर्भकालयें स्थापणें हें समा-जाचें काम आहे. स्वामी दयानंदांनीं असे अनाथाश्रम पुष्कळ काढले. महा-राष्ट्रांत ज्योतीबा फुले यांनीं स्वतःच्या हिंमतीवर प्रथम असा एक अनाथाश्रम काढला होता. त्याच स्फुर्तीवर पुढे न्या. मू. रानडे यांनीं पंढरपुरास एक मोठें "अनाथालय" काढिलें, तें अजून चांगले चालू आहे. आर्यसमाज हा प्रत्येक

---

[१] ईश्वरचंद्र विद्यासागर पृ. ८२

गोष्ट, 'वेदकालीन जशी होती तशी घडते कां' हें पहात असतो. तेव्हां जर विधवाविवाहाला वेदांत आधार नसेल तर नियोग पद्धतीनें विधवा स्त्रियांना संतती होण्यास बिलकूल अडचण असूं नये असें त्यांचें म्हणणें. व हेंही पटत नसल्यास विधवाविवाह मग तो शास्त्रीय संमत असो वा नसो करावाच.' असें त्यांचें ठाम मत आहे. विधवाविवाहासंबंधी ही अशी लाट जी त्या वेळच्या वीस ते पंचवीस वर्षांत उसळली तिलाही कारणें आहेत. पहिलें कारण असें कीं आमच्या धर्मातील व्यंगें काढून तीं आमच्या कानींकपाळी मारण्याचें काम मिशनरी लोकांनीं चालविलें होतें त्या त्यांच्या करण्यामागें सद्हेतू होता असें मुळीच नव्हे. आपल्या धर्माची महती सांगावयाची म्हणजे दुसऱ्या धर्माची टवाळी करावयाची ही सामान्य जनांची नीती त्यांनी अनुसरली होती. तुमच्या धर्मांतील ही पहा काळीं कृत्यें असें म्हणून चिडवावयाचें व अशिक्षीत अडाणी लोकांना भुलवून आपल्या पंखाखालीं दडपावयाचें अशी एकंदर त्यांची पद्धती होती. त्या त्यांच्या मत प्रणालीनें आमच्याकडील सुशिक्षीतांचे डोळे उघडले व त्यांनीं आपल्या धर्मांतच सुधारणा घडावावयास सुरवात केली. कितीतरी मिशनरी लोकांनीं बालहत्या प्रतिबंधक गृहें काढून पोरकीं मुलें पोसावीं व पुढे तीं येशूच्या कळपांत ओढून घ्यावीं असें चाललें होतें. पंडिता रमाबाईच्या शारदासदनासंबंधींही लोकांना असाच संशय आला होता. गरीब, दीनदुबळ्या अनाथ, समाजानें टाकलेल्या व अडलेल्या अशा विधवांना प्रेमानें जवळ करून त्यांच्यावर येशूच्या प्रेमाची पाखर टाकावयाची या त्यांच्या मायावीपणाला भुलून किंवा अगतिकपणानें सुद्धां पुष्कळ विधवा बाटतही. तेव्हा हा ओघ थांबावा व धर्मावरील कलंक पुसावा या हेतूनें ईश्वरचंद्र विद्यासागर, विष्णुशास्त्री पंडित यासारखे खंदे वीर पुढें सरसावले. विधवाविवाहानें विधवांचें दुःख नाहींसे होणार होतेंच पण त्यानें देशहितसुद्धां ते साधणार होते. देशातील स्त्रीसमाजाला दुःखांत लोटून वेगळेंच हित साधणे अशक्य आहे. या स्त्रीयांच्या दुःखाचा अग्नि असाच पेटत राहिला तर त्यानें देशही पेटेल व त्याची राखरांगोळी होईल अशी त्यांची भावना

होती. पंडितांनीं लिहिलेल्या विधवाविवाहावरील पुस्तकांतून न. र. फाटक यांनीं एक उतारा आपल्या न्या. मू. रानडे चरित्रांत घेतला आहे. तो येथें उतरून घेण्याचा मोह अनावर होतो. तो असा, “ बालपणीं वैधव्य प्राप्त झाल्यापासून जीं असंख्य दुःखें, त्यांची कल्पना ज्यांच्या मुलींचे, बहिणींचे, सुनांचे अथवा जवळच्या संबंधी स्त्रियांचे नवरे बालपणीं वारले आहेत त्यांच्या मात्र मनांस बरोबर येईल. ब्रम्हचर्याच्या धर्मांचे आचरण हातून न झाल्यानें शेकडों विधवा जारिणी झाल्या आहेत. व त्यांनीं गर्भनाश करून आपल्या पित्याच्या, मातेच्या व पतीच्या कुळास कलंक लावला आहे. विधवाविवाह चालू केला असतां वैधव्यापासून आमरणांत होणाऱ्या यातनांचें निवारण होईल. जार कर्मांचे व गर्भनाशाचे गुन्हे कमी होतील आणि त्यांपासून अनेक कुटुंबांची अप्रतिष्ठा होऊन त्यांस कलंक लागतो तो लागणार नाहीं आणि जेथपर्यंत या विवाह चालीचा लोक अंगिकार करणार नाहींत तोंवर कसबिणींचा व्यापार, व्यभिचार, अगम्य गमन, व भ्रूणहत्या (गर्भनाश) या गोष्टींचे गुन्हे उत्तरोत्तर वाढत जातील, कुलांचे कलंक वाढत जातील आणि विधवांचा दुःखाग्नी अधिकाधिकच पेटेल. ” [१] विष्णुशास्त्री पंडित यांनीं आपला सगळा जन्म विधवांच्या उन्नत्यर्थ दिला तेव्हां त्यांच्या सारख्या समाजसुधारकाला विधवा-विवाहाविषयीं इतकी तळमळ वाटणें अत्यंत साहाजिक आहे. मात्र त्यांची ही तळमळ एका विशिष्ट ध्येयावर दृष्टी ठेवूनच झाली आहे असें वाटतें.

या तळमळीच्या मागें व्यक्तींच्या सुखाची तळमळ स्पष्टपणें दृग्गोचर होते. व्यक्तींचें सुख तें समाजाचें सुख असावयास पाहिजे. समजांतील बहु-संख्य जर दुःखानें होरपळून जात असतील तर समाजाच्या एके काळीं उत्तम व्यवहार्य ठरलेल्या रूढी मोडल्याच पाहिजेत. या सद्भावनेनें ही मंडळी प्रेरीत झाली आहेत. याशिवाय या लोकांवर आणखी एका गोष्टीचा प्रामुख्यानें परिणाम झालेला दिसतो तो म्हणजे त्यांनीं केलेला इतिहास व समाज या दोन्ही शास्त्रांचा अभ्यास. आपल्याकडे हीं दोन्ही शास्त्रें पूर्णावस्थेंत नाहींत.

---

[१] न्या. मू. रानडे चरित्र—न. र. फाटक पृष्ठ १३०.

समाजशास्त्राचा अभ्यास मागें पूर्णतया झाला होता पण नवीन परिस्थितींत या समाजाची बदलती घडी बसविण्याला ते समाजशास्त्रज्ञ जागे नव्हते. बहुजन-समाज रूढी हेंच शास्त्र मानीत होता. पाश्चात्यांचें ज्ञान ग्रहण करून या समाजसुधारकांनीं आपल्या समाजाचें निरीक्षण केलें व धडाक्यानें सुधारणेची तुतारी वाजविली. स्त्रियांच्या दुःखांचे डोंगर होते. त्यांतील कांहीं कमी करण्याचे प्रयत्न त्यांनीं केले या प्रयत्नांत स्त्रियांचे शिक्षणाविषयीं विधवाविवाहा-विषयींच आपण लिहिलें तर इतर सुधारणाविषयीं पुढच्या प्रकरणांत लिहूं.

# प्रकरण १० वें

स्त्रियांच्या बाबतींत इतक्या सुधारणा व्हावयाचें काय कारण ? असा प्रश्न साहजिकच मनापुढें उभा राहातो. समाजाचा साकल्याने विचार करीत असतां समाजांतील आधारस्तंभ व्यक्तींचे निसर्गतः दोन भाग पडतात. समाजांतील व्यक्ती स्त्री व पुरुष या दोघांच्या निरनिराळया मनोवृत्तींची मूसच आहे. तेव्हां धार्मिक सुधारणांचा प्रश्न जेव्हां समाजाच्या पुढें राहिला तेव्हां या दोन्ही वेगवेगळया समान पुरुषांच्या भागांचा . निरनिराळा विचार करावा लागला नाहीं. धर्माची अति विस्तृत बंधनें दोघांतही सारखीं होतीं. जातिभेद, मूर्तिपूजा, भक्ती कीं कर्मानें ईश्वर प्राप्ती, इत्यादी गोष्टीसंबंधीं दोघानाही सारखीच चर्चा करण्याचा अधिकार होता ज्ञानपरत्वें हे दोन्ही अधिकार पुरुषच गाजवीत होता. अशा रीतीनें धर्मांतील दोघांनाही सारखीच जाचणारीं बंधनें जेव्हां निर्मूलन करण्याचें काम सुरू झालें तेव्हां त्याच्या अनुषंगाने धर्मांतील इतरही बाबतींत असलेल्या रूढी समाज सुधारकाना आढळून आल्या. त्यापैकीं कांहीं स्त्रीवर्गाला जाचक अशा होत्या. या जाचक रूढी पूर्वींही कोणा सुधा- रकांच्या लक्षांत आल्या नव्हत्या असें नाहीं पण त्या ज्यांना म्हणजे ज्या स्त्रीवर्गाला जाचक होत्या, त्या वर्गाची तेव्हां स्थिती इतकी तापदायक अशी नव्हती. एकत्र कुटुंब पद्धतीनें राहणाऱ्या तेव्हांच्या समाजात ह्या जाचक रूढीनीं स्त्रियांना होणारा त्रास त्यांना भासत नसावा व क्वचित् प्रसंगीं कुटुंबां-

तील कर्त्या पुरुषाला त्या तशा जाचक वाटल्या तर त्या कमी करण्याचें, त्या रुढीने बंधन ढिलें करण्याचें, अधिकारही त्याला दिले होते. ह्या सगळ्या पद्धतीनें स्त्रियांचे दुःख या पूर्वी कधींही वेशीवर टांगले गेलें नव्हते.

इंग्रजी शिक्षणाची सुरवात, ही या स्त्रियांच्या दुःखालाही वाचा फोडती झाली. सतराव्या शतकांतील एकंदर राहणी व कुटुंबव्यवस्था पुढल्या १८ वा १९ व्या शतकांत राहिली नाहीं. एकत्र कुटुंबाचा बंध थोडा थोडा ढिला होऊ लागला. व कुटुंबांतील मुख्याचा दरारा हळूहळू कमी होत चालला. कुटुंबें खुंटत चाललीं, व रूढींचे पाश, त्यांच्या भोंवती घट्ट बसूं लागले. घरांतल्या साम्राज्यास 'स्त्रीसाम्राज्य' अशी पदवी होती ती जाऊन स्त्री पुरुषांच्या साम्राज्यांतील मांडलीक होऊन राहिली. तिचे स्वतःचे तर अधिकार गेलेच पण तिच्यावर आणखी पुष्कळ रूढी लादण्यांत आल्या. स्त्रियांनीं स्वतःच्या स्वतंत्र आशेनें आपल्या ठिकाणी एक कुटुंब पद्धतीचा गौरव करण्याकरितां व ती टिकवावी या हेतूनें ज्या गुणांची आपल्या ठिकाणीं मशागत केली होती ते गुण एकत्र कुटुंब पद्धती फुटल्यानंतर आधाराशिवाय जशी इमारत तसे कोसळून पडले व तसे ते पडावयासच हवे होते. आतां या स्त्रियांनीं सध्यांच्या त्यांच्या परिस्थितीला योग्य असे गुण स्वतःच्या ठिकाणीं बाणवून घेण्याची तयारी दाखवण्यास सुरवात करावयाची होती. त्याच्या आधीं या 'अंधान्या काळांत' स्त्रियांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन त्यांच्यावर पुष्कळ रूढी व गूण लादले गेले. स्त्रियांनींही त्यांचा मुकाट्यानें स्वीकार केला. कांहीं दिवसपर्यंत हीं बंधनें विनातक्रार स्त्रिया सोशीतच होत्या. पुरुषाची दृष्टीही या बंधनाकडे यदृच्छया आलेल्या नियमांतूनच पाहण्याची होती. धार्मिक बंधनांनींच लोक जखडले गेले होते. त्यांच्यापासून सुटका करून घेण्याची जेथें शुद्धच नव्हती तेथें समाजांतील एका अंगावर टाकलेली बंधनें काढून घेण्यास कोणास सुचतें आहे !

यानंतर इंग्रजांचें राज्य नवीन विचारासह आपल्यावर लादलें गेलें. आमच्या जुन्या व कसलेल्या विचारांचा विवेकाच्या तीव्र कसोटीवर परीक्षा

देण्याचा प्रसंग आला. जे जे विचार तर्काच्या व बुद्धीच्या भट्टींत जळून गेले ते हिणकस ठरले. विवेकाचीही कसोटी द्यावयाची तयारी आपल्याकडील प्रथम सुशिक्षीतांनींच केली. त्याला मुख्यतः कारणीभूत म्हणजे ख्रिस्ती मिशनरी लोक. मागें सांगितल्याप्रमाणें या मिशनऱ्यांचा हेतू शुद्ध नव्हता. त्यांची गैरसमजूत झाली ती इतकीच कीं ह्यांच्या मताप्रमाणें त्यांना वाटलें होतें कीं बुद्धिप्रामाण्य जर सनातन हिंदुधर्माला घ्यावयास लावलें तर हे लोक म्हणजे त्यांच्या धर्मातील हिणकसपणा समजून घेऊन ख्रिस्ती धर्म मंदिरांत सामील होतील. ही त्यांची समजूत नवशिक्षीतांनीं खोटी पाडली. त्यांनीं ख्रिस्ती मिशनऱ्यांचें व्यंगदर्शन उपकारात्मक मानलें

निंदकाचें घर । साबणाची वडी । काया ही पासोडी शुद्ध करी ।

या न्यायानें त्यांनीं आपल्यांतील घाणच काढून टाकली. धर्मातील कुजका भाग हा त्यांचा उत्तम छेद्य विषय झाला. त्याच वेळीं स्त्रियाच्या दुःखाकडेही विचारवंतांचें लक्ष लागलें. स्त्रियांना स्वतः दुःख सांगण्याचें तोंड नव्हतें. तें या विचारवंतांनीं त्यांना दिलें व म्हणूनच प्रथम स्त्रीशिक्षणास सुरवात पुरुषाकडून झाली. ज्ञानाचा झरा जसा सर्वांना उघडा झाला तसाच तो स्त्रियोवैश्यास्तथा शूद्राः यांनाही उघडा करण्याचे श्रम पुष्कळ सुधारकांनीं घेतले. स्त्रीदाक्षिण्य ही चीज आमच्याकडे नव्हती असें नाहीं पण तिचा बडेजाव पाश्चात्याप्रमाणें आम्ही करीत नव्हतों इतकेंच. पण त्यावरच मिशनऱ्यांनीं हिनवण्यास सुरुं केलें. त्याला उत्तर देणें भागच होतें. तेव्हां स्त्रियांच्या प्रश्नाकडे सगळे वसून बघूं लागले. इंग्रजी वाङ्मय वाचूनही स्त्रियांच्या कांहीं हक्कांसंबंधीं जाणीव पुष्कळजणांना झाली. अशा पुरुषांत गोपाळ गणेश आगरकर, न्या. मू. रानडे, महर्षि कर्वे यांची गणना होते.

बंगल्यांत याचा प्रादुर्भाव प्रथम ईश्वरचंद्र विद्यासागर यांनीं केला. त्याचें कारण एक तर त्यांची उपजत दयार्द्र दृष्टी व दुसरें म्हणजे इंग्रजी शिक्षणाचा परिणाम. त्यांनीं विधवाविवाहाच्या बाबतींत काय काय खटपटी केल्या त्याचें विहंगमावलोकन मागच्या प्रकरणांत लिहिलेंच आहे. महाराष्ट्रां-

तीलही प्रयत्न आपण पाहिलेच आहेत...स्त्रीशिक्षण व विधवा विवाह यांच्याशिवाय आणखी स्त्रियांच्या बाबतींतील रूढीचा परिहार करण्याकडे कांहीं समाज सुधारकांचें लक्ष कसकसे गेलें ह्याचे परीक्षण करुं. राजा राममोहनराय यांचे पासून सुरवात करावयाची असल्यास त्यांचे स्त्रीशिक्षणाविषयीं व विधवाविवाहाविषयीं काय मत होतें तें आलेंच आहे. बंगाल्यांत ब्राह्मणांतच एक कुलीन म्हणून ब्राह्मणांचा पथ होता. कुलीन या नांवाखालीं कोणतेंही कृत्य करणें त्याना सोपें जात असे. या कुलीनांना एकापेक्षां जास्त बायका करण्याचा हक्क होता. एक कुलीन शंभर शंभर बायकांशीं लग्नें लावी! कधीं कधीं तर ८–९ वर्षांच्या आधीं केव्हां तर त्याच्याहूनही लहान मुलींशीं हे ८०वर्षांचे झालेले कुलीन, लग्नें लावीत. एकापेक्षां जास्त लग्नें नियमानें करूं नयेत असें म्हणणाऱ्या मिशनऱ्यांना हें हिंदूंचें व्यंग टोंचा मारण्यास चांगलेंच सांपडलें. राजा राममोहनांनीं या बहुपत्नीकत्वाविरुद्ध मोठी चळवळ काढण्याचें ठरविलें होतें. त्यांनीं त्यावेळच्या सरकारास अशीं विनंति केली कीं, या बहुपत्नीकत्वाविरुद्ध एक कायदा करावा. त्या कायद्याचें स्वरूप असें असावें कीं त्याने विधवांना नवऱ्याच्या वांट्यांपैकीं मुलाप्रमाणें वांटा मिळावा. इस्टेटीचे असे वाटे प्रत्येक बायकोला मिळाल्यावर इस्टेट फुटून जाईल या भीतीनें तरी 'कुलीन' लग्नें करण्याचा सपाटा ठेवणार नाहींत असें त्यांना वाटत होतें. दुसरेंही त्यांनीं सुचविलें कीं ज्या कोणाला एक पत्नी हयात असता दुसरें लग्न करावयाचें असेल त्यानें तसं मॅजिस्ट्रेटपुढे जाऊन लेखी प्रतिज्ञेवर 'सांगावें कीं, धर्मशास्त्राप्रमाणें दोष असल्यामुळेंच मी दुसरें लग्न करीत आहे. हें सर्व करीत असतां सरकारांत अर्ज विनंत्या होत असतां राजा राममोहनाच्या किंवा त्याच्या वेळच्या समाजसुधारकांच्या पद्धतीप्रमाणें किंवा भक्तीप्रमाणें म्हणा त्यांनीं या गोष्टीलासुद्धां शास्त्रांत आधार आहे हे सिद्ध करून दाखविलें होतें. लोकांचा जसा ग्रंथप्रामाण्यावर विश्वास होता तसा त्याचे तें ग्रंथप्रामाण्य खोडून काढून त्या जागीं नवीन बुद्धीप्रधान तत्वें बसवण्याचें काम राजा राममोहनांनीं केलें नाहीं; हें त्यांच्या काळाला योग्य असेंच झालें. राजा मोहनांनंतर पंडित

विद्यासागर यांनींही या बहुविवाहाविरुद्ध पुष्कळच चळवळ केली. २१००० लोकांच्या सह्यांचा एक अर्ज त्यांनीं सरकारकडे रवाना केला. मागें विधवा-विवाहाच्या वेळीं त्यांनीं २५००० सह्यांचा अर्ज सरकारकडे रवाना केला होता. ह्यावेळीं म्हणजे १८५६ सालीं त्यांना यश आलें. तोच उपाय त्यांनीं आतां योजून पाहिला. १८५७ सालचें बंड नुकतेंच होऊन गेलें होतें. लोकांच्या धार्मिक विचारांत सरकारनें हात घातला तर काय होतें त्याचें त्यांना चांगलेंच प्रत्यंतर आलें होतें. इंग्रजांनीं एक प्रकारचा धसकाच येथील धार्मिक लोकांच्या कल्पनेबद्दल घेतला. आतां यापुढें म्हणून आपण धर्माच्या बाबतींत ढवळाढवळ करावयाची नाहीं असें ठरवून टाकलें. राणीचा जाहीरनामा जो निघाला त्यांत हें प्रामुख्यानें सांगितलें होतें. आजही इंग्रज सरकार जाहिरनाम्यांतील तें कलम पाळीत आहे. ईश्वरचंद्रांच्या त्या अर्जाला वाटाण्याच्या अक्षता मिळाल्या. ईश्वरचंद्रांचा विचार यावर पार्लमेंटकडे या गोष्टीचा विचार करण्यास अर्ज पाठवावा असें होतें. पण तो कित्येक कारणांनीं तसाच राहिला.

महाराष्ट्रांतही कित्येक बारीकसारीक सुधारणा स्त्रीविषयक चालू होत्या. पण त्यापैकीं सगळ्यांत जास्त रण माजलें तें संमती वयाच्या कायद्या वर. संमती वयाचा अर्थ स्त्रीपुरुष विवाहसंबंधांत दोन्ही गोष्टींची वयोमर्यादा ठरलेली असावी. त्या आधीं विवाह होऊं नयेत असा होता. संमती याचा अर्थ लग्नांनीं वधू होणाऱ्या वधुवरांची संमती असा नसून शास्त्रसंमती म्हणजे समाज संमती एवढा केला जात होता. या वेळपर्यंत दोघांच्या मनांचा विचार होऊन लग्नें व्हावींत असा विचारसुद्धां कोणाच्या डोक्यांत घोळत नव्हता. काय जें सुधारावयाचें असेल तें समाजाच्या दृष्टीनें सुधारावें असें चाललें होतें आगरकरांनीं मात्र व्यक्तिविषयक सुखाचा दृष्टीकोन जेव्हां मांडला, तेव्हां प्रेम-विवाहाच्या प्रश्नास सुरवात झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. प्रेम विवाहाची अट सुरवात खरोखरीच व्हावयाची असेल तर विवाह बंधनांनीं जीं वधूवरें जखडलीं जाणार त्यांच्या ठिकाणीं प्रेमाची जाणीव उत्पन्न झाली पाहिजे. ही जाणीव उत्पन्न व्हावयास विवाह वयाची मर्यादा वाढावयास

पाहिजे. व म्हणूनच संमती वयाच्या वादांत आगरकरांनीं एवढ्या हमरी-तुमरीनें भाग घेतला. संमती वयाची रणधुमाळी पाहावयाच्या आधीं आगर-करांची प्रेमविवाह विषयक मताकडे थोडीशी दृष्टी टाकून पाहिल्यास असें दिसेल कीं, "त्यांना स्वयंवर पद्धती पाहिजे होती तेव्हां त्यांनीं स्वयंवराचें मंडन केलें व वेळीं प्रसगीं घटस्फोटाची शक्यता असावी असें सुचविलें ![1] तरुण तरुणींचीं लग्नें तीं वयांत आलीं असतां केलीं म्हणजेच खऱ्या विवाहाची परिणती होते असें त्यांचें मत होतें". विवाहापासून उत्पन्न होणाऱ्या सुखाचा उपभोग अशा ऋतूत [ यौवनाच्या वसंत ऋतूत ] आणि युवयुवतीस स्वेच्छेनुरुप पाणी ग्रहण करु दिल्यानेंच होण्याचा संभव आहे." असें त्यांचें ठाम मत होतें. प्रेमविवाहाच्या विषयींचीं आगरकरांचीं मतें त्यावेळीं लोकांना फार जहाल वाटलीं. पण कै. आगरकर जर जिवंत असते तर त्यांना त्यांच्या म्हणण्याप्रमाणे आतां युवयुवतींचीं स्वयंवरें होत असलेलीं दिसलीं असतीं. मात्र एवढें कबूल करावयास हवें कीं जी सुधारणा आज झालेली दिसत आहे ती फक्त पुढारलेल्या व पांढरपेशा लोकांतच झालेली आहे, असें दिसतें. बहुजन समाज कांहीं थोड्याशा फरकानें अजूनही पूर्वीच्याच रूढ कल्पनांत मनसोक्त गटंगळ्या खात आहे. समाजसुधारकांची मातबरी हीच कीं त्यांनीं प्रतिकूल परिस्थितींत स्वमत प्रदर्शनार्थ व त्यांच्या प्रसारार्थ कायावाचामनें करून जो देहदंड दिला, जो यत्न, जो स्वार्थत्याग केला त्यांनींच ते मोठे झाले. विवाहविषयक चळवळी झाल्या त्या बहुधा पांढरपेशा समाजांतील अडचणी डोळ्यापुढें ठेऊनच झाल्या. त्यापासून बहुजन समाजाचा कांहीं एक लाभ झाला नाहीं. लाभ जर झाला असें म्हणावयाचें असलें तर तो एवढाच झाला असें म्हणतां येईल कीं, वरच्या म्हणजे पांढरपेशा वर्गातील कांहींतरी समाजिक खळबळ चाललेली आहे अशी त्यांच्यापैकीं ज्या कांहीं पुढारी मंडळींना कल्पना आली त्यांनीं पांढरपेशांच्या या चळवळीपासून कार्य कर-ण्याची प्रेरक शक्ती घेतली व स्वतःच्या समाजाच्या अडचणी व जुलूम कमी

---

[1] गो. ग. आगरकर—मा. दा. आळतेकर पृ. ४०७ [2] कित्ता पृ. ४०८

करुन घेण्यासाठीं कंबर कसली. ज्या जमातींनीं अशी स्वोन्नतिकारक चळवळी केल्या त्याचा विचार पुढें होणारच आहे आतां संमती वयासंबंधानें काय काय झालें तें पाहूं या.

मुंबईस एक वृत्तपत्रकार या नात्यानें गुजराथी मनुष्यानें—त्यांचें नांव मलबारीशेट असें होतें,—त्यांने १८८४ सालीं बालविवाह व सक्तीचे वैधव्य यावर दोन टिपणें केलीं व त्यांच्या सर्व प्रति सुधारकांच्याकडे, सरकारकडे व पार्लमेन्टकडेही विचारार्थ रवाना केल्या. या टिपणाचा पुरस्कार न्या. मु. रानडे यांनीं करावयाचें ठरविले होतें. मलबारी शेट अत्यंत चिकट व उत्साही कार्यकर्ते होते. विवाहांतील वधूवरांचीं वयोमर्यादा पुरुषांच्या बाबतींत १४ किंवा १८ व वधूची १२ अशी असावी अशी त्यांनीं कल्पना काढिली. दुसऱ्या प्रकारानें विधवांना सक्तीनें केशवपनादि क्रिया सक्तीनें समाज जर करावयास लावतो त्या साधारणतः पंचवीस ते तीस वयोमर्यादेपर्यंत करुं नये असें पण होतें. आणि या मताला सरकारनें मान देऊन त्याविषयीं एक कायदा करावा असें त्यांचें म्हणणें. यावर खूपच वाद झाला. विवाहांतील वधूचें वय बारा जरी असलें तरी संभोग संमतीचें तिचें वय चौदा असावें असेंही त्यांचें म्हणणें होतें. सरकारी पीनल कोडांत तें वय दहा वर्षांचें होतें. तेव्हा सनातनी लोकांनीं यावर वाद सुरू केला. तेव्हां सरकारने धार्मिक बाबतींत हात घालू नये. काय जे व्हावयाचें असेल तें समजाने स्वतः करावें. पण असें होणें शक्य नव्हतें. कायद्याशिवाय लोक ऐकणार नाहींत असें न्या. मू. रानडे यांनीं सांगितलें. ते म्हणत "सरकार देशाचे नोकर आहे, किंवा लोकांच्या इच्छा अमलांत आणणारें तें एक अंमलबजावणी खातें आहे. असा अर्थ केल्यास योग्य होईल. हिंदुसमाजाला ज्या सुधारणा हव्या असतील त्यांची एक जुटीनें निःसंधिग्ध व स्पष्ट मागणी केल्यास त्या सुधारणा अंमलांत आणील अशा रीतीनें पाहिल्यास कायदा सरकारकडून लादला जाणार नसून लोकच तो (कायदा) आपल्यावर लादून, घेणार आहेत."[१]

आगरकरांनीं ही संमती वयाचा प्रश्न उचलून धरला. सनातनी लोक त्यांच्यावर इतके गरम झाले होते कीं त्यांनीं आगरकरांना ठार मारण्याची धमकी दिली होती. मात्र लो. टिळकांनीं या वेळीं सनातनी लोकांची बाजू " सरकारनें धार्मिक बाबतींत हात घालूं नये " या विचारानें सांवरुन धरली. शेवटीं सरकारने या मलबारी शेटाच्या दीर्घ प्रयत्नांना वाटाण्याच्या अक्षता लावल्या. व हा वाद येथेंच संपला. मध्येंच एक नवीन वाद उपस्थित झाला होता. त्याचें मर्म असें होतें कीं, नवऱ्याचा आपल्या बायकोवर किती ताबा असावा यासंबंधाने. हिंदूधर्म रितीप्रमाणें हा हक्क अबाधित व पूर्ण आहे. तो कांहीं एक विशिष्ट परिस्थितींत स्त्रियांना जाचक होतो; तेव्हां यांतून त्यांची सुटका सरकारी कायद्यानें व्हावी अशी माधवराव रानडे यांनीं बाजू मांडली. सर्व पृथ्वींतील लोक आपल्यावरचढ करुन आपल्यास तुच्छ मानीत आहेत त्याची लाज वाटावी हें एकीकडेच राहून पुरुषास काय सत्ता चालवावयाची असेल ती घरांतील आपल्या स्त्रीसमाजावर चालवावी असें वाटणें याहून अधमपणाची दुसरी कोटी दिसत नाहीं. "[१] अशा विचारांचें एक व्याख्यान त्यांनीं दिलेलें होतें. मुंबईतील दादाजी रखमाजी या खटल्यावरुन हा वाद निघाला होता !

या सगळ्या गोष्टीवरुन हें सिद्ध होतें कीं " स्त्रियांच्या प्रगती प्रीत्यर्थ व त्यांच्या सुखाप्रीत्यर्थ कित्येक समाज सुधारक तडत होते. हिंदुस्थानांतील स्त्रियांची ही पिळवणूक पाहून कित्येकांचे हृदय तुटत होते. " हें अबले! हे अनाथ स्त्रिये! बाई, हिंदुस्थानांत तुझ्या दुःखास पारावरच नाहीं " [२] अशा प्रकारचीं हृदय पिळवटून टाकणारीं वाक्ये निघत. यावरून धार्मिक रुढींचा शास्त्राधारें नाश झाल्यावर नुसत्या श्रद्धेनें धर्मांतील बारीकसारीक दुःखे एका विशिष्ट जमातीवर होणारे जुलूमही सोसावयाचे ही प्रवृत्ती नष्ट होत चालली. बुद्धीप्रामाण्याचे जोरावर जें वाटतें, भासतें व तर्काच्या कठोर कसोटीस उतरतें तेवढेच खरें. बाकीचें मग तें सनातन धर्मानें सांगितलें असो अगर प्रत्यक्ष

---

[१] न्या. मू. रानडे चरित्र पृ. ४०७ [२] किस्ता पु. १३०

परमेश्वराची निःश्वसीत असणाऱ्या वेदांत असो, पाळवयाचे नाहीं त्याला दुर्बलपणानें मान वाकवावयाची नाहीं ही दुर्दम्य वृत्ति समाजाच्या कांहीं भागांत कां होईना पसरविण्याची धमक त्या वेळच्या समाज सुधारकांनीं बाळगिली व त्याप्रमाणें कार्य केलें. यानंतर निरनिराळया समाजांसाठीं त्या समाजांतील लोकांनीं कार्य केलें. त्यांच्या करण्यामागें कोणत्या वृत्ती व कारणें होतीं तीं आपण पुढल्या प्रकरणीं पाहूं.

# प्रकरण ११ वें

**" तिसऱ्यांचें राज्य आल्यानें-आपल्यांतील वरचढ जमातीचें प्राबल्य कमी करण्याचे आटोकाट प्रयत्न करण्यांत आल्यानें-समाजांत समता उत्पन्न होण्यास फार मदत झाली " : महात्मा जोतीबा फुले.**

" वर्णानां ब्राम्हणो गुरुः । " अशी परिस्थिती ज्यावेळीं होती त्यावेळीं खरोखरच गुरू या पदवीला ब्राह्मण पात्र असावेत, पण " जनवना ब्राह्मणो-ज्ञेयः " अशी जेव्हां ब्राह्मणांची व्याख्या होऊं लागली, तेव्हां जन्मल्यानंतर ब्राह्मण्य मिळविण्याकरितां कांहीं श्रम करावे लागत नसल्यानें ब्राह्मण आळशी झाले. संस्कारानें येणारें द्विजत्व ते विसरले. संस्कारांतील तत्वें पार धुडकावून दिलीं गेलीं व नुसत्या तत्वांस महत्व वाढलें. विश्वामित्रासारख्या क्षत्रियांस देखील ज्या काळीं ब्राह्मणत्व मिळविता आलें तो काळ लोक केव्हांच विसरले होते. पुराणकालीं जाति ओळखण्याला ज्ञानाची गरज पडेना. ज्यांचे त्यांचे धंदे उपजिवकेचीं साधनें ठरुन गेलीं होतीं. व एकाच धंद्यांत पिढ्यान्‌पिढ्या राबल्यानें त्या धंद्यांतील कसब वाढीस लागले. अशा तऱ्हेनें धंदेवाल्यांचें संघ ( Guilds ) तयार झाले. प्रत्येक जण आपापल्या धंदेवाल्याकडे स्वयंस्फूर्तीनें पाहूं लागला. रोटीबेटी व्यवहार आपापसांतच होऊं लागले. व शेवटीं ज्ञाती किंवा जाती या नांवानें ओळखूं जाऊं लागल्या. ज्ञान मिळवून व त्याचा

ज्ञानानंद स्वत:स मिळविण्यापेक्षां दुसऱ्यास शहाणें करून सोडणें ही त्यांनीं निर्भेळ परहिताची गोष्ट पत्करली. पण त्यात मग भेदाभेद पडूं लागले. जो शिकण्यास योग्य आहे असे त्याना वाटे त्यासच ते जवळ करूं लागले. अर्थात त्यायोगें विद्येचा फैलाव इतर जमातींत जितका व्हावा तितका होईना. बरें, इतर जमातींनीं तरी स्वोन्नतीचा-ज्ञानार्जनाचा-फायदा करून घेण्याचा प्रयत्न करावा तर तोही स्वतःच्या त्यांनीं धंद्याकडेच लक्ष लावून केला नाहीं व ज्ञानभांडार ब्राह्मणाजवळ राहू लागले. ब्राम्हणानें ब्राम्हणासच विद्या शिकवावी असे होऊं लागलें. त्यांचाही असा एक संघ तयार झाला अशीच व्यवस्था पुष्कळ दिवस चालली होती. ब्राम्हणाचा ऱ्हास होऊं लागून विद्येची उपयोगिता नष्ट होऊन फक्त शाब्दिक विद्या त्याचे-जवळ राहिली व अशा रीतीने ज्या लोकांना फक्त भाषेची अडचण होती, त्यांच्यासाटीं या भाषेतून धर्म कृत्ये करताना लागणारे मंत्र म्हणण्याचे काम कांहीं ब्राह्मणांनीं उचलले. ते उपाध्याय झाले. कांहींनीं शिक्षणाचें पवित्र कार्य उचललें. ज्यानीं शिक्षणाचें कार्य उचललें त्यांना राजे लोक मदत करीत. अशा तऱ्हेने " चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्म विभागश: ! " हे जाऊन चातुर्वर्ण्याच्या पोकळ नांवाखालीं ४०० जाती तयार झाल्या व त्यांनीं आपल्या अंतस्थ जातीभोंवतीं रोटी व बेटी व्यवहाराचा भक्कम तट बसविला. जो तो आपल्याच धंद्यात अतएव कामात मग्न झाला. धार्मिक मतभेद ब्राम्हणांच्या मुखानें तो बोलूं लागला व अशा रीतीने सर्व जमातींच्या धर्माची जबाबदारी ब्राह्मणावर येऊन पडली. पहिल्यादा ही कामगिरी ब्राह्मणानीं बजावलीही. पण पुढे हीं घडी विसकटली· ब्राह्मण हे बुद्धिने चलाख असल्यानें इतर कोणत्याही धंद्यांत आपण चमकू अशी त्याना ओढ लागली असावी व त्यांनीं आपला धर्म सोडला. कांहीं ब्राह्मण गरज म्हणून व कांहीं ब्राह्मण हौस म्हणून क्षात्र वृत्तीनें राहूं लागले.

परकीय लोकाची सत्ता जोंवर हिंदुस्थानांत नव्हती तोंवर हें असेंच थोड्याफार फरकाने चालले पण परकीय लोकाची स्वारी जेव्हां आली, तेव्हां

नुसत्या क्षात्रवृत्तीच्या लोकांकडून त्यांना सोंपवून धंद्याचे काम रेटेना. इतर धंद्यांतील लोक आपल्या धंद्यांत वाकबगार. हे क्षात्रवृत्ती थोडीच पुन्हां पत्क-रणार आहेत ! परचक्र आलें तर क्षत्रियानें ते दूर करावें या दृष्टीनें ते गप्प राहात म्हणून क्षत्रिय वृत्तीने राहाणाऱ्या लोकांचा बिमोड झाला, कीं हिंदुस्थान परकीयांच्या ताब्यांत गेल्याचें समजावें व तसेंच झालें. आपल्या सर्व धर्मीयांवर संकट आले आहे व तें आपण सर्वांनीं अेकत्र होवून झोडपून काढावे असे कोणासही वाटले नाहीं. ' जो राज्य भोगतो तो पाहील ' या वृत्तीनें जनता स्वस्थ होती व म्हणूनच थोड्या लोकानीशीं आलेल्या क्रूर परकीयांनीं अेवढा मोठा संपन्न देश जिंकून घेतला. आमचे राजे गेले, परकीय राजे आले तरी या धंदेवाल्या लोकांना तितकीशी खंत वाटली नाहीं. त्यांचे धंदे चाललेच होते. त्रास झाला तो फक्त क्षत्रिय किंवा पूर्वी राज्य करणाऱ्या लोकांना. बहुजन समाम ह्या व्यक्तियांकडे सहानुभूतीनें पाही, अेवंढच मुसलमानांनीं जिंकलें तेव्हां अशा उदासीन स्तितींत हिंदू समाज होता त्याच वेळीं हे परकीय आलेले मुसलमान जर नुसतेच राज्य करते तर त्यांचें राज्य मला वाटेत अजूनपर्यंत अबाधित चाललें असतें पण त्यांनीं आपल्या स्वतःच्या धर्म प्रसाराचे वेड मनांत घेतलें व सर्व लोकाना म्हणने क्षत्रीय व इतर सर्व लोकांना चिथावलें. हें बाटवण्याचें संकट सर्वच हिंदूना सारखें वाटलें व तेव्हां मात्र त्यांनीं हें सार्वजनिक सकट टाळण्यासाठीं शिवाजी महाराजांना पुढारी करून " धर्मरक्षणाची अटाटी " केली. त्यावेळीं सर्व हिंदुसमाज मुसलमानांविरुद्ध उठला व त्याने स्वातंत्र्य प्रस्थापित केलें. ही उठावणी धार्मिक व बहुतांशीं पुढे राजकीय होती. शिवाजी महाराजांच्या नंतर हिंदवी स्वराज्य व्हावे, असें मात्र राज्यकर्त्या लोकाना वाटेना. मुसलमानाच्या जुलुमांतून आपण कांहीं अंशीं सुटलों तसें इतर हिंदवासीयांना सोडवावें ही उदार बुद्धी पुढील हिंदु राज्यकर्त्यांना आली नाहीं उलट मिळवलेलें आपलें राज्य टिकवण्यासाठींच त्यांनीं हरप्रयत्न केले. आतां राज्ययंत्रही ब्राम्हणांच्या हातीं आलें होतें. त्यांनीं आपली पहिली वृत्ती तर झिडकारली होती व ही दुसरी वृत्ती राज्य करण्याची

स्वीकारली ती त्यांच्यातील कांहीं असामान्य लोकांनीं चांगली चालविली. पुढें ती विलयास जाऊन पोट भरुं व स्वार्थी लोकांचा बुजबुजाट झाला. व हेंही राज्य लयास गेलें. या वेळेस मात्र ज्या शक्तीच्या संघर्षानें हें राज्य लयास गेलें ती शक्ती प्रथम आलेल्या मुसलमानी शक्ती प्रमाणें नसून तिच्यांत फार फरक होता. या शक्तीच्याविरुद्ध उठण्याची लोकांना कल्पनाच होईना ही सत्ता म्हणजे इंग्रजी सत्ता. हे इंग्रज आले तेव्हा बाहेरील जगाचें आमचें ज्ञान अकटोपासून विकटोपर्यंत होतें व इकडे इंग्रज चार देशाचे पाणी प्यालेले, भौगोलिक शास्त्रांत अग्रगण्य असलेले त्यांच्या नवीन पद्धतीलाच लोक भुलून पाहात राहिले. अनायासेंच भौतिक शोधांची वाढ या इंग्रजांचे कारकीर्दींत झाली ती ही त्यांचे पथ्यावर पडली असो.

अशा रीतीनें इंग्रजांचें राज्य आल्यावर आमच्याकडील चातुर्वर्ण्य व आधींच खिळखिळी झालेली धर्मव्यवस्था पार ढांसळावयाच्या बेताला आली. ती ढासळविण्याला अेक तर इंग्रजी राज्यवृत्तींचा, त्यांच्या ज्ञानाचा उपयोग जसा झाला, तसाच या इंग्रजांबरोबर धर्म प्रसाराकरितां पाद्री लोकांचा फार उपयोग झाला. पाद्री लोकांना धर्म प्रसाराचे बाबतीत जेव्हां राजमुद्रांकित प्रयत्न करतां येत ना तेव्हां त्यांनीं शिक्षण, परोपकार या मार्गाआड दडून धर्मप्रसार चालविला. वर सांगितल्या प्रमाणें शिक्षणाचें काम ब्राम्हणांनीं सोडून दिलेलेंच होतें. जें कांहीं शिक्षण उरलें होतें तें वेदांच्या अध्ययनांत व थोडेसें धार्मिक कार्यासाठीं लागणाऱ्या मंत्रांच्या पठणांत ! तेव्हां बहुजन समाज गाढ अंधारांत ! ( आणि हे ब्राह्मणही त्यावेळीं त्याच अंधारांत होते.) धार्मिक श्रद्धेनें करावयाची कृत्यें भटाच्या दलालीनें उरकून घेण्याची इतरेजनांची पद्धती. त्याच वेळीं मिशनरी लोकांनीं हिंदु धर्मातील ढोंगावर हल्ला चढविण्यास सुरवात केली. अज्ञानी इतरे जनांनी ब्राह्मणाच्या तोंडाकडे पाहून "सुटका" आहे कां या दृष्टीनें पाहिलें. ब्राम्हणच जेथें गोंधळून गेले होते, तेथें यांना काय सांगणार ? राजा राममोहन राय, ईश्वरचंद्र, या सारख्या माणसांनीं थोडा मार्ग दाखविण्याचा प्रयत्न केला, पण तो अपुरा पडला. पाद्री

लोकांच्या प्रसारानें लोकांना जशी किंकर्तव्य मूढता आली त्याप्रमाणेंच इंग्रजी नव्या राजवटीनेंही त्यांना नवीन मंत्र मिळाला. कायद्याच्या सुव्यवस्थित चक्राखालीं त्यांनीं सर्वांना यथास्थित भरडून काढलें. जुन्या राजवटीप्रमाणें यांतून कोणालाही सुटका नव्हती. ब्राह्मणांना ते वर्णानाम् गुरुः म्हणून मोकळीक नव्हती. प्रथम प्रथम लोकांना मोठें आश्चर्य वाटलें. ब्राह्मण म्हणजे कोणी मोठे अशी त्यांची अजून देखील कल्पना होती व ब्राह्मणांची देखील तशीच परिस्थिती होती. त्यांना वाटे आपल्याला शिक्षा कशी व्हावयाची ? आपण ती होऊं देणार नाहीं. मनुस्मृतींतल्या आज्ञा मात्र अजूनही ते घोकीत होते कीं, ब्राह्मणानें कांहीं जरी केले तरी त्यांस दोष करुं नये. देहांत तर केव्हांही करूं नये. फार झाल्यास म्हणजे जर त्यांनीं मनुष्य हननासारखें कृत्य केलें असल्यास त्याचें त्याला द्रव्य वगैरे देवून हद्दपार करावा. पण देहांताचें शासन करूं नये. ब्राम्हणांची जात सर्व श्रेष्ठ. त्यांतल्या त्यांत काशी क्षेत्रांतले ब्राम्हण अति पवित्र. त्यांनीं अपराध केल्यास त्यांच्या वाटेला जाण्याची कंपनी सरकारच्या हिंदी शिपाई, यांची छाती नव्हती. अशा काशी क्षेत्रवासी ब्राह्मणांना न्यायासनासमोर खेचून नेण्याचा कायदा जेव्हा निःपक्षपात जरी झाला तेव्हां त्यांनीं ( ब्राम्हणांनीं ) एक उपाय शोधून काढला व सरकारचा प्रतिकार चालविला. कोणी पकडावयास आला कीं अंगावर वस्तान्यानें अगर सुरीने घाव करून घ्यावयाचे एवाढ्यने न भागलें तर विष खाण्याचा धाक घालावयाचा. केव्हां केव्हां विष खावयाचे. इतक्या उप्पर सरकारी शिपाई जर ऐकतनासे झाले तर जमिनींत खड्डा खणावयाचा व त्यात एकदी बाई बसवावयाची व खड्ड्याभोंवती सर्पणाचा ढीग घालून धरपकड झाल्यास बाईच्या बलिदानाची, दटावणीची, भिती दाखवावयाची. या प्रकाराने पुष्कळदा सरकारी कायद्याची अंमलबजावणी फेटाळून त्यांना, ब्राह्मण्याच्या छत्राखालीं सुरक्षितपणें गैरकायदा हक्कावर पुष्ट होतां येत असे. कंपनी सरकारच्या अंमलाखालीं कित्येक वर्षें ब्राह्मणाला खुनाबद्दल फांशीची शिक्षा देण्याचा प्रघात नव्हता इतकी वरचढपणाची वृत्ती ब्राह्मणांची होती. पेशवाईच्या वेळीं ब्राह्मणांचें राज्य. त्यांच्या

वेळीं कोण बोलणार? व बोलणार तें कोणाजवळ आणि त्याचा काय उपयोग होणार होता? जनता अज्ञ होती. तिला अर्धी हा आपल्यावर जुलूम होत आहे याची जाणीव होत नव्हती. इतकी ती बधीर झाली होती. आंग्लाईच्या या काळांत मिशनरी लोकांनीं खालच्या लोकांत धर्म प्रसाराचे इच्छेनेंच कां होईना ज्ञानाचा प्रसार जोरानें चालविला. त्यायोगें त्या लोकांच्या इच्छेला तोंड फुटलें व इंग्रजांच्या निःपक्षपाती न्यायी कायद्याची प्रत्यंतरें त्यांना आल्यानें ब्राह्मणांच्या इच्छेविरुद्ध बोलल्याने आपणांस त्रास होणार नाहीं अशी त्याची खात्री पटली. पण या दोन्ही गोष्टींनीं ब्राह्मणेतर लोकांत जागृती उत्पन्न झाली. ती जागृती तांतडीने उत्पन्न होण्यास आणखीही एक कारण मिळालें. तें हे कीं अव्वल इंग्रजींत सरकार दरबारी जीं माणसें नोकर पेशा पत्करींत होतीं तीं बहुतांशीं ब्राह्मणच होतीं. " हीं ज्ञानलव दुर्विदग्ध " माणसें आपस्वार्थी, पोटभरू वृत्तीचीं होतीं त्यांनीं स्वतःच्या स्वार्थापायीं अशिक्षित व अडाणी लोकांस नाडविलें व त्यांचा छळ केला. हें एक भडका उडविण्याला निमित्तमात्र कारण झालें. या ब्राह्मणेतर चळवळीचें नेतृत्व महात्मा जोतिराव गोविंदराव फुले यांनीं पत्करलें. लहानपणीं शाळेंत जाण्याची इच्छा असूनही ब्राम्हण शिक्षकांच्या मनाईमुळें त्यांचे शिक्षण होऊं शकलें नाहीं. पुढें एका मुसलमान मुनशींच्या सांगीवरून इंग्रजी शिक्षणाचा ओनामा त्यांनीं गिरविला व पुढें चार पाच वर्षांत तेही शिक्षण सोडून दिलें. फुले यांच्या भोंवतीं त्या काळीं तरी ब्राह्मणांचें वर्चस्व सगळीकडे होतें. धार्मिक बाबतींत मिशनऱ्याच्या संसर्गामुळें उदासीनता व परावलंबित्व हीं दोन्हीं त्यांना भेडसावींत होतीं. ब्राह्मणाचें धर्म सांगण्याचें काम त्यांनीं सोडून दिले व ते पैसे कमाऊन चंगळ करीत बसले आहेत व अक्षरशत्रु समाज धर्माच्या ढोंगाखालीं अंधारांत खिचपत पडला आहे हे भयानक दृश्य पाहून त्यांना वाईट वाटलें. " सत्यधर्म " लोकांना कळत नाहीं. त्याना कळवून देण्याचें ज्यांचें काम ते तें करीत नाहींत तेव्हां त्या खिचपत पडलेल्या लोकांपैकींच जे आपण, त्या आपणच तें काम करावें अशी त्यांना स्फूर्ति झाली व त्यांनीं

सत्यशोधणारा "सत्यशोधक" समाज स्थापन केला. त्यांना सत्य शोधावयाचें होतें. "ब्राम्हणांचे वर्चस्व" हेंच मूळ कारण बहुजन समाजाच्या धार्मिक व आर्थिक घसरगुंडीला आहे असा ठाम सिद्धांत त्यांनीं बसविला व त्या कार्याकरतां ब्राह्मणेतरांची एकजूट करावयाचा त्यांनीं प्रयत्न केला. ब्राह्मणाचें वर्चस्व कां आलें यांची नेहमींची उपपत्ती धार्मिक तर असेच, पण ती ब्राह्मणाच्या मूळ खादाड व पोटभरू प्रवृत्तींत आहे असे ते म्हणत. प्रथमारंभीं दिलेल्या मीमांसेप्रमाणें ते ब्राह्मण, आपल्या कर्मापासून चळले होते हें खरें. पण जसे ब्राह्मण आपल्या कर्मापासून चळले होते त्या प्रमाणेच इतरही लोक थोड्या फार फरकान त्याच्या वृत्तीपासून चळले होते हेही खर होतें. एकटे ब्राह्मणच दोषी होते असें म्हणतां येणार नाहीं. सगळीकडूनच आभाळ भरून आलें होतें. धर्मासंबंधीं समाजासंबंधीं आस्था कुठेचं दिसून येत नव्हती. ब्राह्मणांनीं आपली बुद्धि व धार्मिक ज्ञान स्वार्थपरायण केलें. ज्या साधनांचा उपयोग समाजोद्धारासाठीं व्हावयाचा तीं साधने व्यक्तींच्या सुखासाठीं उपयोगांत आणलीं गेलीं. तीं तशीं उपयोगात आणूं देण्यास इंग्रजी सत्ता उपकारक झाली. इंग्रजी सत्तेनें ब्राह्मणांचा उपयोग आपली सत्ता येथें स्थिर करून घेण्यास केला व ब्राह्मणांनीं तसा आपला उपयोग होऊं दिला ! जोतीराव फुले यांनीं इतका खोल जाऊन विचार केला नाहीं कीं, जी परकीय सत्ता आलेली आहे तिच्या साधनीभूत ब्राह्मण-वर्चस्व आहे. तेव्हां त्या सत्तेच्या पालटीनें ब्राह्मण वर्चस्वही कमी होईल. समजा पेशवाई असती–म्हणजेच पर्यायानें ब्राह्मण-सत्ता असती–तर असें करणें योग्य झालें असतें. पण आतां ती ब्राह्मणी राज्यसत्ता पूर्णपणें नाश पावली होती. नवीन परकीय सत्ता येथे उदय पावली होती. तेव्हां त्या परकीय सत्तेला येथें स्थिर करणारे येथीलच लोक सरकारला पाहिजे होते. ते हे शिकलेले व त्यावेळीं त्या काळच्या दृष्टीने पुढारलेले म्हणून ब्राह्मण उपयोगी पडले. तेव्हां यावेळीं ब्राह्मणांच्या विरुद्धच मुख्यत: हांकाटी पिटण्यास कारण नव्हतें. वाटल्यास नोकरशाही विरुद्ध हाकाटी पिटली असती तर चालेल. आपण क्षणभर असेंही समजूं कीं जोतीराव फुले यांना नोकरशाही अतएव

परकीय सत्तेविरुद्ध तक्रार करावयाची होती पण ती त्यांना तशी करतां न आल्यानें 'ब्राह्मणाचें वर्चस्व' या नांवानें त्यांनीं केली पण त्यांच्या ग्रंथांतून असा संदर्भ काढता येत नाहीं यावरून एवढेच म्हणता येईल कीं त्यांचा दृष्टीकोन तितकासा उदार नव्हता. असें जरी असलें तरी त्यापासून एक मोठा फायदा झाला कीं "सामाजिक चळवळीला सामाजिक वर्गविग्रहाचें स्वरूप प्राप्त होण्यास त्यांची विचारसरणी कारण झाली... ब्राह्मण जातीच्या वर्चस्वाविरुद्ध अशा प्रकारची आक्रमणशील चळवळ होणें हिंदु समाजांतील ब्राह्मणेतर जातींत स्वाभिमान उत्पन्न करण्याच्या हेतूने अपरिहार्य होतें... तसेंच ब्राह्मण लोकांतील दुराराध्य व दुराग्रही लोकाना सामाजिक समतेचें विचारांत घेण्यास त्यांनीं भाग पाडलें.[1] समाजांतील गाजणुकीविरुद्ध ओरड करण्यास जोतीराव फुले यांनीं शिकविले व अशा रीतीने समतेचें मोठें तत्त्व त्यांनीं हिंदू समाजात प्रस्थापित केलें. हें फार मोठे कार्य झालें यांत संशय नाहीं. आजपर्यंत ज्या सुधारणा कराव्या अशी ओरड चालली होती त्या सगळ्या वरिष्ठ जमातीच्या बाबतच्या होत्या. बहुजन समाजांत चेतना उत्पन्न करून त्यांना उठवून स्वकर्मतत्पर करण्याचें कार्य पहिल्यांदा "सत्यसमाज" या संस्थेनें केलें. या अर्थी तो समाज चिरतर ओळखला जाण्यास हरकत नाहीं. या समाजाची स्थापना एकदर हिंदु समाजाला जरी उपकारक झाली तरी तो समाज फार काळ टिकूं शकला नाहीं. याचे कारण त्या समाजानें जी आकूंचित ध्येयें आपल्या पुढे ठेविलीं तीं होय. या सामाजाचीच पुढची आवृत्ती म्हणजे महाराष्ट्रांत व इतरही बाहेर निघालेली ब्रह्मणेतर चळवळ होय. ब्राह्मणेतर चळवळ म्हणजे सत्यसमाजाचे विश्वरूप होय. ही चळवळ-सुद्धां फार वेळ जोर धरूं शकली नाहीं कारण तिच्यांत फार ध्येयनिष्ठा नव्हती. उलट सरकारी नोकऱ्यांचा फायदा जे ब्राम्हण आदि शिष्ठ लोक घेत होते तो आपल्या समाजांतील शिक्षित लोकांस मिळावा एवढाच उद्देश त्यानीं डोळ्या-पुढें ठेवला होता असें दिसतें.

---

[1] आधुनिक भारत—शं. द. जावडेकर पृ. १३६

सत्यसमाजामुळें वर्गविग्रहाला कशी सुरवात झाली याचें दुसरें प्रत्यंतर म्हणजे पुण्यांतील "न्हावण्य प्रकरण" होय. कांहीं ब्राम्हणांवर त्यांनीं न्हाव्याच्या नव्या घराची वास्तुशांती केली म्हणून जुन्या बुरसलेल्या सनातन्यांनीं ग्रामण्य केलें. तेव्हां त्या ब्राम्हणांची सुटका व्हावी म्हणून न्हाव्यांनीं सनातन्यांची हजामत करावयाची नाहीं असा ठराव केला व अशा रीतीनें आपलें महत्व पटवून दिलें.[1]

हिंदु समाजांत अशा प्रकारची समता उत्पन्न व्हावी म्हणून स्वामी दयानंदांनींही प्रयत्न केला. जातिसंघ जे जन्मानें बनले होते ते मोडून गुणकर्म विभागशः करण्याचें धोरण त्यानीं ठेविलें व त्याकरतां आर्यसमाज स्थापून जातीभेद मोडून टाकला व हिंदू तितका एक अशी त्यांनीं व्याख्या केली. शिक्षणाचें द्वार जें ब्राम्हणांना उघडें होतें तें निरनिराळ्या शाळा स्थापून सर्वांस उघडें केलें. त्यांनीं सांगितले कीं जन्माच्या श्रेष्ठपणावर उभारलेला जातिभेद मोडा व श्रेष्ठ गुणधर्माच्या कसोटीवर वर्णभेद माना व स्पर्शास्पर्श मानूं नका.[2] या त्यांच्या दिव्य संदेशानें पंजाबांत पुष्कळ जाति संस्थेस धक्का बसला.[3] ही आर्यसमाजाची चळवळ सर्व हिंदुस्थानांत एकी व समतेचें बीं पेरणारी होती. आणि हें सर्व कशामुळें झालें तर आर्यसमाजाच्या प्रभावी तत्वज्ञानानें तर खरेंच पण त्याला आणखीही एक कारण होतें.

जतिभेद मोडण्याचा प्रयत्न राजा राममोहनांनीं केला नव्हता असें नव्हे तर तो इतक्या उत्कटत्वानें केलेला नव्हता. बंगाल्यांतील प्रसिद्ध व जगाच्या पुढें आदर्शभूत असलेले स्वामी विवेकानंद, सुद्धां जाती मोडून समाजांत समता उत्पन्न व्हावी या मताचेच होते. पंजाबांत फिरत असतां त्यांनीं समाजाला जो उपदेश केला तो देखील या समानतेचा पोषक असा आहे. तो उपदेश असा कीं 'पोटजातींतील बेटी व्यवहाराला सुरवात करून

---

[1] न्या. मु. रानडे चरित्र —न. र. फाटक कृत पृ. १२०

[2] स्वामी दयानंद सरस्वती—हरी सखाराम तुंगार पृ. २३९.

[3] पहा: In the Punjab there is not only interdining but also to some extent intermarriage among the different castes.

पोटजाती नाहींशा करणें.' त्यांनीं बेटी व्यवहाराचा उपदेश केला आहे म्हणजे रोटी व्यवहार हा तर त्यांनीं गृहित धरल्या सारखेंच केलें आहे. ते याच उपदेशांत पुढें म्हणतात कीं " श्रीमंत लोक सामान्य लोक यांच्यामध्यें हल्लीं जे मोठें खिंडार पडलेलें आहे असें दिसतें तें भरून काढणें, सामान्य लोकांत शिक्षणाचा प्रसार करणे व त्यांना तत्वज्ञानाऐवजीं भाकरी देण्याची तजवीज प्रथम करून त्यांची स्थिती सुधारणें. "[१] या त्यांच्या सांगण्यांत तर " समता व त्या पुढील भाकरीचें तत्वज्ञान प्रतिबिंबीत झालेले दिसतें.

समाजाच्या धार्मिक आकांक्षेप्रमाणें त्यांची खरी भूक भागवण्याकडेच याच्या पुढच्या विचारवंताना काम करावें लागेल. धार्मिक सुधारणा आवश्यक आहेतच, त्याच्यापुढें समाजिक सुधारणा करणें जास्त आवश्यक आहे असेंही कित्येकांना भासत होतें. म्हणून त्यांनीं समाज सुधारणा हें आपले ध्येय ठेविलें. पण सामाजिकांत राजकीय व आर्थिक गोष्टींचा समावेश केल्याशिवाय चालावयाचें नाहीं. ही गोष्ट आतांपासून लोकाच्या प्रत्ययास हळूहळू येऊं लागली. म्हणून पुढच्या चळवळीस प्राधान्यतः सामाजिक चळवळ असें नांव न मिळतां राजकीय चळवळ असें दुसरें नामाभिधान प्राप्त झाले व त्याच्यापुढेंही राजकीय चळवळ नसून ही अर्थिक चळवळ आहे असें बुद्धीवंत म्हणूं लागले तेव्हां ही राजकीय व आर्थिक चळवळ करतांना समाजोपयोगी कामें कसकशीं झालीं हें आपण पुढच्या प्रकरणांत पाहूं या.

---

[१] स्वामी विवेकानंद चरित्र भाग ६वा संपादक रा. ना. मंडलीक पृ. १५४८

# प्रकरण १२ वें

## आधुनिक राष्ट्रवादाचा विकास : राजकीय–आर्थिक हक्कासाठीं आधीं झगडणार : सामाजिक सुधारणा त्यांचे पाठोपाठ येतीलच !

राजा राममोहनापासून आगरकरापर्यंत धार्मिक–सामाजिक सुधारणांच्याच सुकाळ का होता तें आपण आतांपर्यंत पाहिलेच. या प्रकरणांत सामाजिक, 'राजकीय' या नव्या नांवानें कसे मिरवीत आहे तें पाहावयाचें आहे. अस्पृश्योद्धाराची कल्पना ब्राह्मसमाज स्थापिल्यापासूनची आहे. × रामकृष्ण परमहंसासारख्या योगमार्ग आचरणाऱ्या महंतानें मुद्धां "सर्वधर्मसमभाव" जाहीर केलेला होता. एकनाथाच्या रूढींनीं घट्ट आवळलेल्या काळीं सुद्धां जेथे अस्पृश्योद्धाराची कल्पनाही नव्हती त्या काळीं दयेच्या पोटीं एकाददुसरें "अत्यंजाचें मूल घेई कडेवरी" असे कृत्य झालें असेल. जाणून बुजून अस्पृश्योद्धार करावयाचा ही गोष्ट इंग्रजी राज्यात आली. मिशनऱ्यांची टोंचणी व खिस्ती समाजाकडे जाणारा अस्पृशाचा लोंढा या दोन कारणांनीं लोकांचे लक्ष या

---

× "There is an impression in certain quarters that in Rama Mohan's time (in the Samaj) the Sudras were not allowed to hear the recitation of the Vedas. This is not true." —R. R. M.—pp. 97.

चळवळीकडे वेधलें. " तुमच्या धर्मांत तुम्हांस मान नाहीं. येशूच्या कळपांत या " अशा भुलावणीनें हजारों अस्पृश्य बाटूं लागले. पण येशूच्या कळपांत गेल्यानें त्यांना महत्व आलें नाहीं. स्पृश्यास्पृश्य भेद जाण्यास खरें कारण त्यांच्यात शिक्षणाचा अभाव हें होय. " अस्पृश्यता जाऊन स्पृश्यताच काय, पण अन्य-रीतीनेंही त्यांची सामाजिक व सांपत्तिक स्थिती सुधारण्यास विद्या हीच उपयोगी पडण्यासारखी आहे...यास्तव अयोग्य स्पृश्यास्पृश्यभेद नाहींसा करावयाचा असेल तर अंत्यजजातीचें सुशिक्षण वाढणें हाच खरा व मुख्य उपाय आहे. " [१] असें केसरीनें वारंवार बजाविले आहे. पण केसरीच्या आधींसुद्धां आर्यसमाजानें स्पृश्यास्पृश्य भेद आपल्या पंथांतून काढून टाकावयाचा उघड उघड प्रयत्न केलेला होताच. सर्वांत मोठा व अभिमानाचा प्रयत्न म्हणजे महा-राष्ट्रांत झालेला जोतिराव फुले यांचा. खरोखर फुले यांनीं अमोल धैर्य दाखवलें. जोतिराव फुले यांनीं " अतिशूद्रांच्या शिक्षणाकडे आपलें लक्ष पुरवलें...त्यानीं १० सप्टेंबर १८५३ सालीं आपल्या जिवलग मित्रांच्या सहाय्यानें महार मांग इत्यादि लोकांस विद्या शिकविण्याकरतां मंडळी काढली...( त्यावेळीं ) अस्पृश्यांच्या...शाळेसाठीं...गांवांत जागा मिळणेंहि मुष्कील होतें. इ. स. १८५८ त या संस्थेच्या पुण्यांत तीन शाळा होत्या व एकंदर मुलांची संख्या २५८ होती. शाळेंत मुलांना पाणी पिण्यास अडचण पडे म्हणून जोतिरावांनीं आपल्या घराजवळील हौद अस्पृश्यांना खुला केला " [२]. महात्मा जोति-रावांचें महात्मेपण यांत आहे, यांत संशय नाहीं. जोतिरावांनीं हें काम इतक्या चिकाटीनें व धैर्यानें केलें; याच्या मागें त्यांना ख्रिस्ती मिशनऱ्यांकडून सततो-द्योगाची मिळालेली शिकवण होय. त्यांचा ख्रिस्ति लोकांशीं परिचय मोठा होता. आपल्या धर्मांतील चुका पाद्र्याकडून कळाल्यावर इतक्या तांतडीनें व कळवळीनें कार्याची उठावणी जोतिरावांइतकी दुसऱ्या कोणी केली नाहीं. बुद्धीलाच प्रमाण मानणारे आगरकर या सुधारणेस आपला सक्रीय पाठिंबा

---

[१] केसरीप्रबोध भाग ३ रा

[२] महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी—प्रा. गं. बा. सरदार पृ. १४१

देत. " समाजाच्या विलक्षण राहाटीमुळें उच्चनीचत्व अस्तित्वांत येऊन तदनु- सार जो व्यवसाय विभाग सहजगत्या झालेला आहे त्यास ईश्वरकृत व सनातन मानून उच्चवर्गांत जन्मास आलेल्या लोकांनींच वर्गांत जन्मास आलेल्या लोकांस अपवित्र व अस्पृश्य मानणें याहून मनुष्याच्या विकारीपणास लांछना- स्पद अशी दुसरी गोष्ट नाहीं ! " [१] असें त्यांनीं ठणठणीत बजावलें. आगरकरांच्या विचारसरणीमागें श्रद्धेचा नाश करून बुद्धीलाच अतएव विचाराला प्राधान्य देण्याचीच वृत्ति आहे. म. जोतीराव फुले यांनीं सनातन लोकांच्या श्रद्धेलाच धक्का दिला असा या दोघांमध्यें फरक आहे. अस्पृश्यो- द्धाराची ही शुद्ध सामाजिक पायावर उभारलेली चळवळ या नंतर राजकीय क्षेत्रांतही वावरुं लागली " हिंदुसमाजातील सामाजिक विषमतेला नष्ट करण्याचें प्रतीक म्हणून त्यांनीं ( महात्मा गांधी ) अस्पृश्यतानिवारण व हरिजनोद्धार यास आपल्या राष्ट्रनिर्मितीच्या विधायक कार्यांत अग्रस्थान दिलें आहे " [२]. राष्ट्राची एकी करावयाची म्हणजे राष्ट्रांतील घटकांची देखील एकी प्रथम असावयास पाहिजे. ज्या दृष्टीनें हिंदूमुसलमानांचा प्रश्न हिंदुस्था- नांस जाचक झाला आहे त्यांच्यात एकी नसेल तर कांहींही विधायक कार्य होणार नाहीं असें, जसें राजकीय मत प्रस्थापित झालेलें आहे त्याचाच छोटासा भाग–फक्त हिंदुमात्रांपुरता म्हणजे अस्पृशोद्धार हें होय. व याच दृष्टीनें या सुधारणेस आतां सामाजिकापेक्षा राजकीय महत्व प्राप्त झालें आहे. अस्पृश्यांना राजकीय रीत्या हिंदूधर्मापासून तोडण्याचा प्रयत्न वर्तुळपरिषदेंत ब्रिटिशांनीं जेव्हां केला तेव्हां महात्मा गांधी प्राणपणानें जे त्यांच्याविरुद्ध लढले त्यांतील तरी इंगित हेंच होतें " आधुनिक भारताच्या इतिहासांत राजकारण, धर्मकारण व समाजकारण या सर्वच दृष्टींनीं महात्मा गांधींनीं जें कार्य केलें त्याला फार महत्व आहे व त्याची मधुर फळें भावी पिढ्यांस चाखावयास मिळतील. डॉ. आंबेडकर, या बाबतींत जे अस्पृश्योद्धाराची म्हणजे आपल्या जमातीची उन्नती

---

[१] गो. ग. आगरकर—मा. दा. आळतेकर पृ. ३६४

[२] आधुनिक भारत—शं. द. जावडेकर पृ. ६०४

करण्याकरितां झटत आहेत त्यांची ही चळवळ सुद्धां पायाशुद्ध राजकीय आहे. "पूना पॅक्ट" करतांना ही गोष्ट दिसून आली. आपल्या जमातीला राजकीय हक्क मिळाले कीं आपोआपच तिच्यांत सुधारणा येतील हें या चळवळीचें सूत्र आहे. मुसलमानांप्रमाणे आपणालाही हिंद्वेतर समजून वेगळी निवडणूक व वेगळें मतदान असावें असें ते म्हणत याचा तरी अर्थ काय आहे? महात्मा गांधींनीं मात्र प्राणांतिक उपोषण करून या जमातीला हिंदूधर्मीयांपासून फुटूं दिलें नाहीं. त्याचे वेगळे राजकीय प्रतिनिधी पाठविण्याचे हक्क मात्र कबूल केले. यावरून अस्पृश्योद्धाराची चळवळ राजकीय क्षेत्रांत कशी मोडते हें दिसून येईल. कॉंग्रेस सरकारें स्थापन झालीं असतां सगळीकडे ही अस्पृश्यता घाल-विण्याकरतां सरकारनें कसा उद्योग केला हें सर्वांस विदित आहेच. महात्माजींनीं तर 'अस्पृश्य' हे लाजिरवाणे नांव बदलून 'हरिजन' हे गोड नांवच दिलें आहे.

आतांपर्यंत आपण सामाजिक हिताच्या दृष्टीनें आलेल्या सुधारणा केव्हां व कां झाल्या ते पाहिलें. आधीं सामाजिक कां आधीं राजकीय हा वाद फार पुरातनचा आहे. हिंदुस्थानची राष्ट्रीय सभा जी स्थापन झाली तिचें मूळ या धार्मिक व सामाजिक उन्नतीच्या या तळमळींतच आहे. ज्यावेळीं इंग्रजी राज्याची पक्कड हिंदी जनतेवर बसली तेव्हां भांबावलेल्या स्थितींत हिंदी जनता जेत्याचें अंधानुकरणच करूं लागली. तिला थोडीशी स्वत्वाची जाग राजा राममोहनांनीं आणली. अर्थात अशा वेळीं राजकीय विचारास फारसा वाव देणें शक्यच नव्हतें. तरीपण विलायतेत गेल्यावर जें काम राजा राममोहनांनीं केलें तें खरोखरच अद्वितीय प्रकारचे होतें यांत संशय नाहीं. धार्मिक व सामाजिक बाबतींतच त्यांचें कार्य दिसते पण सनदशीर चळवळीचें खरें उत्पा-दक तेच होते. दादाभाई नौरोजी यांनीं इंग्लंडांत जाऊन निवडणुका लढवून जें राजकारणाचे लोण पार्लमेन्ट सभागृहापर्यंत पोहोंचवलें, त्याची सुरवात राजा राममोहनांनींच केली होती.

प्रथम प्रथम लोकांची समजूत होती कीं, सामाजिक कामगिरी केल्या-शिवाय आणि सुधारणा आपणच केल्याशिवाय राजकीय हक्क मिळून सुद्धां

उपयोगी नाहीं. लोकहितवादींची शतपत्रें याला साक्षी आहेत. महात्मा फुल्यांसारख्या समाज सुधारकांस फारशी दूरदृष्टी नव्हती असें धरून चाल-ल्यास न्या. मू. रानडे याची दृष्टी तरी व्यापक असावयास नको होती काय ? पण राजकीय हक्काची तांतडीने मागणी करण्यास त्यांना धैर्य होत नव्हतें. इतकेंच नव्हे तर असें बोलणें म्हणजे त्यांना " फाजीलपणाचें " वाटे. आर्यसमाजानें अखिल हिंदुमात्राच्या उद्धाराकरतां चंग बांधला पण राजकीय हक्काकरतां भांडण्याचें त्यानींही विशेषसे मनावर घेतलें नाहीं. विवेकानंदांचा अतएव रामकृष्ण परमहंसांचा आदेश तरी धार्मिक समभावाशिवाय दुसरा कोणता होता ? सगळया समाजसुधारकाची ही ओढ कीं, 'आधीं आपली सुधारणा करून घ्या.' असे होण्यास कारण तरी काय असते ? त्याचें कारण असें की पाश्चिमात्यांच्या ज्ञानगंगेच्या झोताखालीं व त्यांच्या सुधारणांच्या धनधान्या-खालीं या सुधारकांची बुद्धि बधीर होऊन गेली होती. आपले जें गेलें तें आपल्याच कमीपणामुळें गेले ही भावना न्यूनगंडामुळें आपल्या लोकांत शिरली. शिवाय निर्बलपणाने निष्क्रियता आलेली होती ती निराळीच. या दोन कारणां मुळे निर्धोक समाजसुधारणाच अंमलात आणणे सोयीचें होतें व तसे त्यांनीं केलें.

'आमच्या देशास कांहीं एक झाले नाहीं' या आत्यंतिक उक्तीनें विष्णुशास्त्री चिपळूणकरानीं या समाजसुधारणांची ज्यांना घाई झाली होती त्यांना झणझणीत अंजन दिले. काय जर झालें असेल तर दुसऱ्याच्या ताब्यांत देश गेला असल्यानें इथल्या लोकांची बुद्धि फिरली आहे असे त्याचें म्हणणें. तेंच आगरकर टिळकांनीं वेळीं प्रसंगीं सामाजिक सुधारणा दूर लोटून राज-कीय सुधारणांस महत्व दिलें. आगरकर सामाजिकांपेक्षां राजकीयास जास्त महत्व देत हें उघड आहे पण ते 'राजकीय-सामाजिक' ही जोडी नेहमीं बाळगीत. विशिष्ट प्रकारच्या राजकीय व्यवस्था समाजाच्या अस्तित्वाला आवश्यक आहेत, म्हणजे त्या नसल्या तर समाजाची वाताहात होते. सामा-जिक सुधारणांची तशी गोष्ट नाहीं. त्या समाजास शोभा देतात किंवा एक प्रकारचा आनंद उत्पन्न करतात. तेव्हां त्या मागून झाल्या तरी चालतील.

( राजकीयापासून ) आम्हांस जो त्रास होत आहे त्यामुळें सामाजिक दुराचारापासून होणारा त्रास कांहीं नव्हे असें म्हटले तरी चालेल असें त्यांचें मत होतें. टिळक तर उघडउघड सामाजिक सुधारणा दूर ढकलीत. इ. स. १८९५ तला राष्ट्रीय सभेच्या मंडपाचा वाद तर याच गोष्टीमुळें माजला. [१] या सालापासून निदान महाराष्ट्रांत तरी राजकीय पक्ष आधीं व मग सुधारणा अशी राजवट ठरली. ' सामाजिकास राजकीयानें बगल दिली ' असें म्हणावयास हरकत नाहीं. तरी पण सामाजिक कार्यास महत्व आणखी पुढें येणार होतें. बंगाल्यांत सुद्धां सुरेन्द्रनाथ बानर्जी यांनीं राजकीय प्रकरणास पुढे खेंचलें. हिंदी राष्ट्रीय सभा स्थापन झाली. तिच्यांत राजकारणाचा खल होऊं लागला. १८८७ त ह्यूमसाहेब म्हणतात " आम्हीच राष्ट्राचे प्रतितिधी आहोंत हें राष्ट्रसभेचें मत खरें नाहीं. " [२] यावरून राजकारण भडकत चाललें होतें हें स्पष्ट आहे. कांहीं काळ ' सामाजिक ' मागें पडलें होतें हें खरें, पण महात्मा गांधींच्या अवतारानें पुन्हां ह्याचा उदय व्हावयाचा होता. महात्मा गांधींनीं सत्य व अहिंसा या धार्मिक गोष्टींवर जेव्हां हिंदुस्थानचें राजकारण आणलें तेव्हां पुन्हां सामाजिक प्रश्नाला चालना मिळाली. मात्र राजकीय व सामाजिक असा जो भेद पूर्वीं दाखवला जात असे तो आतां दाखवला जात नाहीं. आगरकरांनीं जी सर्वांगीण सुधारणा बुद्धिप्रामाण्यावर आरंभली होती ती महात्मा गांधींनीं धार्मिक पायावर रचिली आहे. हा या दोहोंमधील फरक आहे. म. गांधींच्या सामाजिक कार्याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे त्यांनीं आंखलेली व चालवलेली हरिजन चळवळ.

जसजसें राजकारण वाढत जाऊं लागलें त्याप्रमाणें दलित वर्गाविषयींचें प्रेम व त्यांच्यविषयीं कळकळ ही सुद्धां बहुजन समाजांत वाढत चालली. औद्योगिक प्रगती झाल्यानें निरनिराळया धद्यांतून असणाऱ्या मजुरांचे संघ निर्माण होत चालले. मजुरांचे प्रमाण जसजसें वाढत चाललें तसतसे त्यांचें

---

[१] टिळक चरित्र भाग विसावा खंड पहिला पृ. ४४१ पहा.

[२] आधुनिक भारत पृ. ३४४

हितसंबंध "कोणीतरी" पाहाणें जरूर होऊन बसलें. मजूरवस्ती मुंबई, कलकत्ता, जमशेटपूर, अहमदाबाद या सारख्या मोठ्या शहरांतून असल्यानें त्यांची राहाणी त्यांचा पगार इत्यादि बाबतींत गिरणी मालकांशीं विचारविनिमय करणे हें मजुरांचे मजुरांकडून होणे शक्य नव्हतें. मालकांकडे जाऊन आपलीं गाऱ्हाणीं सांगणें हें मजुरांना माहीत नव्हते. १९०८ सालीं मुंबईतील पहिला संप स्वयंस्फूर्तीनें झाला पण अजूनही त्यांच्या मागण्या व्यवस्थित रीतीनें मांडणारे मंडळ तयार झालें नव्हतें. ज्याप्रमाणें दलित वर्गाच्या गाऱ्हाण्यांना तोंड म. जोतिराव फुले यांनीं फोडलें त्यप्रमाणें मजुरांना कोणीतरी पुढारी पाहिजे होता. तो प्रसंग युद्धोत्तर कालांत आला. रशियन राज्यक्रांतीने जगाला नवीनच तत्वज्ञान मिळवून दिलें होतें. मार्क्सप्रणित तत्वज्ञानानें इकडील तरुणांचीं मनें मोहून गेलीं व भांडवलदार व मजूर यामध्ये लढा होणे अपरिहार्य होऊन बसले. याची जाणीव येथील भांडवलदारवर्गाला सुद्धां होऊ लागली. सर दिनशा वाच्छा हे म्हणतात— "कामगारवर्ग आपल्या कामाचा, आपल्या श्रमाचा, मालक बनवण्याची, आपल्या स्वातंत्र्याची मागणी करणार. त्या नवीन स्थित्यंतराची दिशा दाखवणारे वारे वाहूं लागले आहेत." [1] स्वतःची मागणी जोरदाररीतीनें व परिणामकारक मांडण्याकरितां संप करणें आवश्यक होऊन बसलें. पुढे पुढें मजुरांची चळवळ करून आलेली शक्ति फक्त मजुरांचे हित पाहणार असें नसून तिच्या अंगीं राजकीय सत्ताही उलथून पाडण्याचें सामर्थ्य असते असें मार्क्सचें तत्वज्ञान व लेनिनचें कार्य पाहून येथील पुढाऱ्यांना वाटूं लागलें व हिंदी कम्यूनिस्ट पार्टी स्थापन झाली, व अशारीतीनें मजुरांच्या सामाजिक हितापेक्षां तिला म्हणजे या चळवळीला राजकीय रूप येऊं लागलें. हिंदुस्थानचे राजकीय संबंध कसे असावेत हा वाद हिंदुस्थानांत निघून येथील मजूर पक्षाने हिंदुस्थानच्या हितसंबंधास धोका येईल असे वर्तन न करतां वागावें असेंही म्हणणारा एक पक्ष कम्युनिस्टांत निघाला व हिंदुस्थानचे राजकारण जागतिक राजकारणावर न्यावें असें कांहीं

[1] आजकालचा महाराष्ट्र पृ. २१८

शेतकऱ्यांसही वाटूं लागले. शेतकऱ्यांची शक्ति संघटीत करण्याचे फारसे प्रयत्न झाले नाहींत. महात्मा गांधींचे पट्टशिष्य वल्लभभाई पटेल यानीं मात्र बार्डो-लीच्या करबंदीची चळवळ तेथील शेतकरी लोकाची संघटना करुन यशस्वी करुन दाखवली. ही चळवळ स्वराज्यप्राप्तीकरता केलेली नसून शेतकऱ्यांच्या हितासाठींच केलेली आहे. कॉंग्रेसनेंही यापुढें आपल्या सगळ्या वार्षिक सभा खेडेगावांतून भरवण्याचें ठरवलें. उद्देश हा कीं, शेतकऱ्याना राष्ट्रीयतेची जाणीव व्हावी व राजकारणी पुरुषानीं शेतकरी सभा स्थापन कराव्यात. उत्तर हिंदुस्थानात 'किसानसभा,' फार जोरान काम करीत असून त्याचे पुढारी शेतकऱ्याच्या हितासाठीं जपत असतात. अशा तऱ्हेनें शेतकरी व कामकरी या दोन्ही वर्गाची सामाजिक प्रगती राजकारणाशीं निगडीत होऊ पहात आहे.

एकंदर समाजाच्या शिक्षणावरही सामाजिक व राजकीयाकडे दृष्टी फिरविल्याचे परिणाम झाले. इंग्रजी शिक्षण हे आपल्या राष्ट्राला मागून घेण्यांत राजा राममोहनाचा जो उद्देश होता तोच उद्देश इंग्लिश लोकाचा ती विद्या आपल्याला देताना नव्हता. "कारकून बनविण्याचे कारखाने" असे या शिक्षण संस्थाविषयीं म्हणावयास हरकत नाहीं. शिक्षणाचा बालमनावर जो कायमचा ठसा उठवला जातो त्यावरून तीं मुले पुढे समाजाच्या उपयोगी पडणारी निप-जतील कीं नाहीं हें समजतें पण आमचे शिक्षणच मुळीं परप्रेषित यामुळें प्रजा निःसत्व निपजते. हलके काम करण्याची लाज वाटूं लागते, फाजील अभिमान शिरतो. डौलाचा शिरकाव होतो व मनुष्य कामास नालायक होतो. ही शिक्षणाची दिशा बदलली पाहिजे. "राष्ट्रीय शिक्षण हा विषय विशिष्ट जातीकरता नाहीं. तो सर्व जातींकरतां सार्वजनिक विषय आहे." [१] असें लो. टिळकांनीं बजबजावून सागितलें आहे. लोकांचें शिक्षण लोकांचे हातांत पाहिजे या तत्वानुसार सरकारी शाळा कॉलेजापेक्षां खासगी प्रयत्नावर चाललेल्या शाळांकडे लोकांचें लक्ष वेधले. स्त्रियांचे शिक्षण त्यांना उपयोगी व हितकर असें असले पाहिजे. या तत्वावर महर्षी अण्णासाहेब कर्वे यांनीं

---

[१] लो. टिळक यांची व्याख्यानें पृ. १६१

शेतकऱ्यांसही वाटू लागले. शेतकऱ्यांची शक्ति संघटीत करण्याचे फारसे प्रयत्न झाले नाहींत. महात्मा गांधींचे पट्टशिष्य वल्लभभाई पटेल यांनीं मात्र बार्डोलीच्या करबंदीची चळवळ तेथील शेतकरी लोकांची संघटना करुन यशस्वी करुन दाखवली. ही चळवळ स्वराज्यप्राप्तीकरता केलेली नसून शेतकऱ्यांच्या हितासाठींच केलेली आहे. कॉंग्रेसनेही यापुढे आपल्या सगळ्या वार्षिक सभा खेडेगावांतून भरवण्यांचे ठरवले. उद्देश हा की, शेतकऱ्यांना राष्ट्रीयतेची जाणीव व्हावी व राजकारणी पुरुषांनीं शेतकरी सभा स्थापन कराव्यात. उत्तर हिंदुस्थानांत 'किसानसभा,' फार जोरानें काम करीत असून त्यांचे पुढारी शेतकऱ्यांच्या हितासाठी जपत असतात. अशा तऱ्हेनें शेतकरी व कामकरी या दोन्ही वर्गांची सामाजिक प्रगती राजकारणाशीं निगडीत होऊं पहात आहे.

एकंदर समाजाच्या शिक्षणावरही सामाजिक व राजकीयाकडे दृष्टी फिरविल्याचे परिणाम झाले. इंग्रजी शिक्षण हें आपल्या राष्ट्राला मागून घेण्यात राजा राममोहनाचा जो उद्देश होता तोच उद्देश इंग्लिश लोकांचा ती विद्या आपल्यास देतांना नव्हता. "कारकून बनविण्याचे कारखाने" असे या शिक्षण संस्थाविषयीं म्हणावयास हरकत नाहीं. शिक्षणाचा बालमनावर जो कायमचा ठसा उठवला जातो त्यावरून तीं मुलें पुढें समाजाच्या उपयोगी पडणारी निपजतील कीं नाहीं हें समजतें पण आमचे शिक्षणच मुळीं परप्रेषित यामुळें प्रजा निःसत्व निपजते. हलकें काम करण्याची लाज वाटूं लागते, फाजील अभिमान शिरतो. डौलाचा शिरकाव होतो व मनुष्य कामास नालायक होतो. ही शिक्षणाची दिशा बदलली पाहिजे. "राष्ट्रीय शिक्षण हा विषय विशिष्ट जातीकरता नाहीं. तो सर्व जातींकरता सार्वजनिक विषय आहे."[१] असें लो. टिळकांनीं बजवजावून सांगितलें आहे. लोकांचे शिक्षण लोकांचे हातांत पाहिजे या तत्वानुसार सरकारी शाळा कॉलेजांपेक्षां खासगी प्रयत्नावर चाललेल्या शाळांकडे लोकांचे लक्ष वेधलें. स्त्रियांचे शिक्षण त्यांना उपयोगी व हितकर असें असलें पाहिजे. या तत्वावर महर्षी अण्णासाहेब कर्वे यांनीं

---

[१] लो. टिळक यांचीं व्याख्यानें पृ. १६१

महिला विद्यापीठाची स्थापना केली. यानंतरचा शिक्षण शास्त्रांतील सुधारणुकीचा मोठा प्रयत्न म्हणजे डॉ. झकीर हुसेन यांच्या अध्यक्षतेखालीं निघालेला वर्धाशिक्षणयोजना हा होय. शिक्षण हें कार्यकारी झाले पाहिजे. नुसतें पोटभरू कारकुनी पेशाचें शिक्षण उपयोगी नाहीं. शिक्षणक्रम संपल्यावर प्रत्येक व्यक्ति स्वत:चे पोट भागवून राष्ट्राच्या या जगड्व्याळ यंत्रांत उपयोगी पडणारी शक्ति झाली पाहिजे अशी ही राजकीय दृष्टी शिक्षणापर्यंतही येऊन पोचली.

अशा रीतीनें या सामाजिक विषयांतूनच राजकीय दृष्टी कशी डोकावली आहे व हळु हळू या राजकीय दृष्टीनें आपलें मानाचें स्थान कसें मिळविलें आहे तें आतांपर्यंत आपण पाहिलें. या राजकीय आंदोलनाच्या बुडाशीं पूर्वीप्रमाणें मात्र यापुढें सामाजिक प्रश्न येणार नसून मुख्यतः आर्थिक प्रश्नांचा विचार प्रामुख्यानें होणार आहे, तेव्हां आर्थिक परिस्थिती व राजकीय परिस्थिती यांचा अन्योन्य संबंध व त्यांचें मीलन कसें झालें हें पाहण्याचें हें ठिकाण नव्हे. 'सामाजिक' या शब्दाची व्याख्या जितकी मोठी करतां येईल त्यामानानें त्यावर होणारी चर्चाही वाढेल. पण 'सामाजिक'चा अर्थ नेहमींचाच लक्षात घेऊन येथपर्यंत आपण येऊन ठेपलों.

सामाजिकांतून राजकीयांत आपण पोचलों. त्याचा परिणाम मात्र फार चांगला व हितकर असा झाला आहे. प्रत्येक बाबतींत नवीन दृष्टी येत चालली असून एकंदर समाजाचा आत्मविश्वास वाढत चालला आहे. "अव्वल इंग्रजींत असलेली न्यूनगंडाची वृत्ति जाऊन आपण कांहीं करूं" असें हिंदवासीयांना वाटूं लागले आहे. इंग्रजी व हिंदी संस्कृतींचा मिलाफ इतका सुंदर झाला आहे कीं, इंग्रजी संस्कृतीवर बांडगुळाप्रमाणें हिंदी संस्कृती पोसली न जातां तिनें इंग्रजी संस्कृतींतील स्फूर्तीदायी जीवनरस शोषून घेतला आहे. त्या नवीन शक्तीच्या जोरावर व स्वयंप्रेरणेवर हिंदिस्थानांतील जनतेचा इतका विश्वास बसला आहे कीं, आमच्या संस्कृतींतून आम्ही जगाच्या तत्वज्ञानांत विशेष प्रकारची भर खात्रीनें टाकूं अशी अहंगंडाची भावना सगळीकडे उफाळत आहे.

चैतन्याचें वारें खेळत आहे. ही सगळी परिस्थिति डोळ्यापुढें येऊन मोठ-मोठ्या पुरुषांच्या नावाची मालिका दिसूं लागते. [illegible]मोहनरायांपासून ते महात्मागांधीपर्यंत सर्वांच्या विचारांत एक सूत्रबद्ध [illegible] दिसतो. उंसाच्या प्रत्येक कांड्यातून दुसरें कांडें निघावें त्याप्रमाणें प्रत्येक समाजसुधारक पुढल्या सुधारकांस उपकारकच झालेला आहे. कालपरत्वें समाजसुधारक हें नांव जाऊन तो 'राजकीय सुधारक' हें नवें नांव धारण करीत असेल इतकाच त्या दोघां मधला फरक! पण या सर्वांनीं प्रत्येक हिंदवासीयांच्या मनांत आत्मविश्वासाची जी सुरेख ज्योत पेटवून दिली आहे त्याबद्दल त्यांचे सर्वांनीं ऋणी असा-वयास पाहिजे.

# समारोप

## " कांहीं आधुनिक समाज–धुरीणांच्या जीवनांत बदल घडवून आणणारे विशिष्ट विचार प्रवाह. "

विषय प्रवेशांत कोणकोणते विषय या निबंधांत वर्णिलेले आहेत व एकंदर निबंधाचा रोख कोणत्या गोष्टी वर्णन करण्याकडे आहे हें लिहिलेंच आहे. आतां या ठिकाणीं सुविचार प्रवाहाची जुळणी आमच्यामतें कशी केली आहे हें दाखवावयाचे आहे. बदलाबदल घडवून आणणारे किंवा आणणारा विचार प्रवाह सांगत असतांना कोणत्या कृत्यामुळे व कोणत्या कृत्यावर त्याचा परिणाम झाला हे सांगणे अपरिहार्य आहे. म्हणून हिंदुसमाजात झालेल्या सामाजिक खळबळीचे चित्र साकल्याने काढावे लागले; पण ते चित्र तसे काढतांना त्याची पार्श्वभूमी, कारणपरंपरा दाखवून सजविण्याचा प्रयत्न केला आहे. Formative influence चा अर्थ अशा रितीनें बदल घडवून आणणारे विचार प्रवाह असा केला आहे. Modern social reformer म्हणजे " समाज सुधारक " असा जो नेहमीचा अर्थ केला कीं ज्याची व्याप्ती राजकीय सुधारकापर्यंत येऊन पोंचत नाहीं अशी व इतकी कोती व्याख्या " समाजसुधारकाची " केलली नाहीं. ' समाजसुधारक " हा सर्वांगीण सुधारक असतो. त्याच्या कार्यक्षेत्रांत देखील राजकीय कार्यांचा समावेश होतो. या

व्याप्तीनें " समाजसुधारक " हा शब्द आम्ही वापरला आहे. तरीपण इ. स. १९०० च्या पुढे ज्या समाजसुधारकांनीं राजकीयास व आर्थिक विषयास प्राधान्य दिलें त्याची विशेष चर्चा येथें जास्त प्रस्तुत नसल्यानें केली नाहीं. " Modern " या शब्दाने अव्वल इंग्रजीपासून सुरुं झालेल्या काळाचा बोध घेतलेला असून १७९० च्या पुढें तो काळ घडलेला आहे. ही झाली विषयांची व्याप्ती. असो.

राजा राममोहनांच्या काळापासून इंग्रजीसत्तेचा जो दाब हिंदी जनतेवर पडला त्याचे ठसे कसे उमटले आहेत तें पहा. ' जित असल्यानें जेते लोकांविषयीं वाटणारी भीतियुक्त आदरार्थी न्यूनगंडता ' होती. यामुळें पहिल्या पंचवीस वर्षांत, सर्वांचीच गोंधळलेली व निष्क्रीय परिस्थिती होती; पण या न्यूनगंडाचा फायदा मिशनरी लोकानीं घेण्याचा उपद्व्याप केला. व प्रसगीं धर्मवेडानें अनाचार केले. पाद्री लोकांची येथील लोकांच्या धर्मसमजुतीसंबंधानें वेगळी समजूत होती असे दिसते. ती त्यांची गैरसमजूत होती हें लवकरच येथील विचारवंत समाजसुधारकानीं धार्मिक रुढीमंबधीं बंड करून आपल्यांतच सुधारणेस हात घालून व मिशनऱ्यांच्या प्रयत्नाला प्रतिकार करून सिद्ध केलें. एवढेच करून हे विचारवंत थाबलेले नाहींत. तर त्यानीं युरोपीय सस्कृती आत्मसात् करण्याचा प्रयत्न केला. युरोपियनाची राज्यपद्धती, त्यांचे लोकाचार, त्यांचे वाङ्मय, त्याच्या भाषा, त्यांची समाज–रचना यांचा खोल अभ्यासूवृत्तीनें अभ्यास करून त्यांच्यातील जेवढे चागलं तेवढे घेण्याचा, बुद्धीस पटेल तेवढेच घेण्याचा स्तुत्य उपक्रम करून श्रद्धन आलेल्या रूढीच्या लोणास सपाटून मार दिला. " विश्वासावलबी कल्पनास आणि आचारास विवेकाची आंच देऊन झाडून पाहणे हे सुधारकाच्या अनेक कर्तव्यापैकीं एक कर्तव्य होऊन बसले. "[१] बुद्धीवादानें, " अज्ञात गोष्टीवर ज्ञानाच्या साह्यानें प्रकाश पाडून त्या ज्ञात करण्याचा उद्योग " सुरू झाला. व त्याकरतां त्यांनीं " अज्ञात व दुर्ज्ञेय असे जे विचार यांत आहेत त्यांचें सशोधन चालू ठेवणें, "

[१] प्रिन्सिपॉल गो. ग. आगरकर चरित्र. श्री मा. दा. आल्तेकर. पृष्ठ २३९

व "अशा प्रकारचें संशोधन हें बुद्धीवादाचें एक अत्यंत महत्वाचें अंग होऊन बसलें." [१] अशा तऱ्हेनें मूलगामी विचारसरणी जेव्हां आमच्या समाज सुधारकांच्या डोक्यांत थैमान घालूं लागली तेव्हां अर्थातच "सर्वांगीण सुधारणा" हें त्यांचें ध्येय झालें. म्हणून राजकीय याची सामाजिकाशीं फारकत यापुढें नष्ट झाली. जरी कांहींनीं स्वतःच्या दृष्टीकोनाप्रीत्यर्थ कधींकधीं सामाजिकास बगल दिली असली तरी त्यांना एक सुधारणा समर्थनीय म्हणून जोरानें मांडतां आली नाहीं. उदा. लो. टिळकांचे विचार पहा. यापुढें राजकीय गोष्टींत व सामाजिकांत सारखेंच लक्ष घातल्यानें परक्या देशांत नवीनच सुरूं झालेले वाद ( isms ) आमच्या घराच्या ओसरीवरून निःशंक रीतीनें वाहूं लागले. त्याचें प्रत्यंतर निरनिराळ्या मतप्रणाली ज्या आतां आपल्या देशात दिसत आहेत त्यापासून प्रत्ययास येईल. याचा एक मोठा परिणाम झाला तो हा कीं, समतेचें बिऱ्हाड प्रत्येक विचार कल्पनांच्या घरीं प्रस्थापित झालें. व त्यामुळें वर्गविग्रहाला जोर चढला. या सगळ्या राजकीय समाजचित्र परिस्थितींतूनच सध्याच्या राष्ट्रीय वादाचा विकास झाला. व तें धोरण हिंदुस्वातंत्र्याच्या राष्ट्रीयसभेनें अंगिकारिलें. हिंदुस्थानकरतां त्याच्या संस्कृतीस पोषक होईल असा नवा मार्ग महात्मा गांधींनीं अहिंसा व सत्य या जोडीच्या जोरावर लोकांपुढे ठेविला व त्याप्रमाणें सर्व शब्दांस आपल्याबरोबर वागवीत आणले आहे. या सर्व घडामोडींचें बीज आर्थिक चळवळींत आहे. आधीं आर्थिक स्वायत्तता मिळविली पाहिजे. ती मिळविण्याच्या आधीं राजकीय स्वातंत्र्य हें ध्येय ठरवणे हा प्रश्न आहे, असा सर्व राष्ट्राचा, निश्चय घडत आलेला आहे. या घटनांमागें मात्र मागच्या सर्व अनुभवांचे पाठबळ आहे व इंग्रजी सत्तेच्या पहिल्या संघर्षामुळें सगळीकडे पसरलेली उदासीनता व न्यूनगंड पार नाहींसे होऊन त्यांची जागा प्रचंड आत्मविश्वासानें घेतली आहे. जें कार्य हातीं घेऊ त्याची इतिश्री चांगल्या प्रकाराने होईल व झालीच पाहिजे असा आत्मविश्वास हिंदी जनतेत उत्पन्न झाला आहे. या आत्मविश्वासाचा कडेलोट

---

[१] आगरकर चरित्र पृ. ३४१

कधींकधीं हिंदीराष्ट्राविषयीं दाखविण्यांतही झालेला आहे. या रीतीने हिंदी राष्ट्राचा विकास कसकसा होत गेला हें दाखविलें आहे. प्रथमतः धार्मिक नंतर सामाजिक त्यावर राजकीय व पुढे आर्थिक असे चार विभाग हिंदी आंदोलनाचे इंग्रजी अमदानींत पडतात. पैकीं धार्मिक, सामाजिक आंदोलनांचा व विचार प्रवाहांचा विचार वर्ण्य असल्यानें साकल्यानें दिलेला आहे. शेवटच्या एका प्रकरणांत मात्र राजकीय विचारांचा थोडक्यांत विचार केला आहे. कांकीं राजकीय सुधारणा सामाजिकांतूनच निघाली. तिची एक बाजू राजकीय असली तरी दुसरी बाजू अजून सामाजिकाचीच आहे.

थोडक्यात समाज सुधारकांच्या जीवनांवर कोणत्या गोष्टींचा परिणाम कारणीभूत झाला असें सांगावयाचे झाल्यास...

> "प्रथमतः जित झाल्याने व काय करावें हें न कळल्यानें निष्क्रिय व गोंधळलेली परिस्थिती झाली. त्यातच मिशनरी लोकांच्या धर्मवेडेपणानें, सेवावृत्तीनें आपल्यांतीलच धार्मिक रुढींचा नाश करण्याची प्रवृत्ती निपजली व युरोपियन वाङ्मय व शिक्षणानें श्रद्धेपेक्षां बुद्धिलाच प्राधान्य देण्यांत आलें. परकीय वाङ्मयाच्या वाचनानें विचारशक्ती रुंदावून परदेशस्थ वाद घरांत आले व समतावादाचें युग सर्वांगीण सुधारकांनीं अंगिकारलें. या सर्वांगीण सुधारणेच्या वादांतूनच आधुनिक राष्ट्रवादाचा विकास होऊन न्यूनगड पार धुतला गेला व स्वतः-विषयीं आत्मविश्वास वाढला." असें म्हणतां येईल.

ज्या समाजसुधारकांच्या जीवनाचा विचार या निबंधांत केला आहे त्याच्याविषयीं दोन शब्द लिहीणें अस्थानीं होणार नाहीं. ज्या समाजसुधारकांनीं आपल्या सुधारणांनीं स्वतःच्या विशिष्ट विचारपद्धतीचीं माणसें तयार केलीं व त्यांच्या ठिकाणीं आपले विचार जिवंत ठेवले त्यांचाच मुख्यतः उल्लेख केला आहे. असे समाजधुरीण म्हणजे राजा राममोहनराय, ईश्वरचंद्र विद्यासागर, दयानंद सरस्वती, गोपाळ गणेश आगरकर, महात्मा जोतीबा फुले, न्या. मू.

रानडे इत्यादी होत. बाकीच्या समाजसुधारकांचा उल्लेख प्रसंगाचे विवेचन करतांना आलेला आहे. विषयाचे भाग कसे पाडले आहेत ते विषय प्रवेशांत दिग्दर्शित केले आहेच.

विषयाचे विवेचन करतांना ठिकठिकाणीं उद्धृते घेतलीं आहेत. तीं घेतांना विषयाशीं योग्य अशींच निवडण्याचा प्रयत्न केला आहे. जीं जीं पुस्तकें वाचनाकरता मिळालीं त्यांच्या त्याच्यातून उद्धृते घेतांना तीं योग्य तऱ्हेनें व खरींच मांडलीं आहेत कीं नाहीं हें पाहण्याकरतां त्याच विषयाच्या तसल्याच दुसऱ्या पुस्तकाच्या आधाराविना तीं घेतलीं नाहींत. उदा. लोकहितवादींच्या शतपत्रातील उतारा अगर त्यावरील भाष्य याचे उद्धृत घेतांना तो शतपत्राशिवाय इतर ज्या दोन तीन ठिकाणीं उतरून घेतलेला दिसला तेथें तेथें पाहूनच व त्यांतील फरक अवलोकून घेतलेला आहे. विषयाची व्याप्ती अतिशय मोटी होत असल्याने जरी १७९० ते १९४० पर्यंतचें आलोडन करावयाची दृष्टी ठेवली असली तरी इ. स. १८२५ पासून १९०० पर्यंत झालेल्या सुधारणाच विशेषरीत्या सांगाव्या लागल्या. हा काळ म्हणजे युरोपीय व तात्कालीन हिंदुसंस्कृतीच्या संघर्षणाचा काळ होय. मुसलमान व हिंदुसंस्कृतीच्या संगमानें नवीन कला व नवीन भाषा उदयास आल्या. व हिंदी संस्कृतीचें कांहींसें आशिया खंडांतील धार्मिक संस्कृतीसारखें रूप बनलें. पण इंग्रजी सत्ता ही युरोपची. तिची संस्कृती आधिभौतिक व आमची आध्यात्मिक. तेव्हा या दोहोंचा मिलाफ झाल्यावर जी आतां नवीन पाश्चात्याभिमुखी संस्कृती भारतात उदय पावत आहे तिच्या उषःकालाचे वर्णन या काळात झालें आहे. आमच्या आध्यात्मिकाची महती पाश्चात्यातील विद्वानांना आली असून त्यांच्याकडील आधिभौतिक वाद आम्ही पचनीं पाडिले आहेत. या दोहोंचा सुंदर समन्वय होऊन आधुनिक भारतीय संस्कृती उदय पावणार आहे. असे न होईल तर चालणार नाहीं. "केवळ भौतिक विद्येची उपासना करणारे लोक अंधारांत पडतात आणि केवळ आध्यात्मिक विद्येची उपासना करणारे त्याहूनही घोर अंधःकारांत पडतात. असे ईशोपनिषदानें

म्हटलें आहे. त्याचा अनुभव आधुनिक युरोपीय इतिहासावरून आणि गेल्या दोनशें तीनशें वर्षांच्या भारतीय इतिहासावरून जगाला आलेलाच आहे. आधुनिक भारताने त्याचीं अत्यंत अनिष्ट फळे भरपूर चाखलीं आहेत. तेव्हा यापुढे तो भौतिक विद्या व आध्यात्मिक विद्या यापैकी कोणाकडेही दुर्लक्ष करील असे वाटत नाहीं." [१] आपण वर्णन केलेल्या उपरिनिर्दिष्ट विषयात देखील हीच भौगोलिक वादाची व अध्यात्मिकवादाची लढाईच दिसत आहे. अध्यात्माने जखडलेल्या आम्हांला इंग्रज लोकाशी म्हणजेच युरोपीय संस्कृतीच्या लोकाशीं आज जो प्रसंग आला त्याने भारताचा खरोखरी फायदाच झाला आहे. भारताने स्वतःची संस्कृती त्या योगे प्रगमनशील बनवून घेतली आहे व आता त्याला जगात पुढे येण्याला एकच अडचण उरली होती व ती म्हणजे स्वातंत्र्याची. ती त्याने आता मिळवली आहे, " तिचे स्पृहणीय स्वरूप सर्व मानव जातींच्या भौतिक व आत्मिक आकांक्षांना संतुष्ट करण्यास समर्थ होईल आणि हीच भारतीय संस्कृती मानवसंस्कृती म्हणून जगभर पसरेल." [२] या अशा संस्कृतीच्या उषःकालीन छटा भारताच्या नभःपटलावर पसरत असतांना ज्या ज्या महापुरुषानीं प्रयत्न केले त्यांचे त्यांचे चरित्र अवलोकन करण्याचे भाग्य काहीं काळ का होईना मला लाभले. त्यांच्या संगतींत राहावयास लाभले. याच भाग्याने मला धन्य वाटत आहे व त्यांचा वियोग आतां होणार म्हणून विषादही वाटत आहे. या आनंद विषादाच्या समासमान परिस्थितींतच लेखणीला विराम देणे प्राप्त आहे.

---

[१] आधुनिक भारत पृ. ७२१ [२] कित्ता पृ. ७२२.

# कालक्रम-सूचि

( या प्रबंधांत ठिकठिकाणीं उल्लेखिलेल्या गोष्टींचा कालक्रम सनवार येथें देण्यात आला आहे. )

| | |
|---|---|
| १८०३ | नाना शंकरशेट जन्म ( मुंबई ). |
| १८१० | मराठींतील पहिलें छापील पुस्तक ( सिंहासनबत्तिशी ) |
| १८१४ | दादोबा पांडुरंग याचा जन्म. |
| १८२१ | संस्कृत पाठशाळा, पुणें. |
| १८२२ | डॉ. भाऊ दाजी लाड यांचा जन्म. |
| १८२३ | लोकहितवादींचा जन्म. |
| १८२४ | दयानंद सरस्वती यांचा जन्म. |
| १८२५ | सतीचा कायदा |
| १८२५ | विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचा जन्म |
| १८२५ | दादाभाई नौरोजी यांचा जन्म |
| १८२८ | जोतीराव फुले याचा जन्म |
| १८२९ | सतीची चाल बंद |
| १८३२ | पूर्वधर्मातील ईस्टेट मिळवून देणारा कायदा |
| १८३३ | पाश्चात्य शिक्षणाचा उपक्रम |
| १८३५ | मुद्रण स्वातंत्र्यवाद |
| १८३७ | डॉ. भांडारकर यांचा जन्म |
| १८४० | गुरु परमहंस सभा |
| १८४० | जगन्नाथपुरीचा कायदा |
| १८४१ | न्या. मू. रानडे यांचा जन्म |
| १८४२ | बेळगांवीं दोन ब्राह्मण बालविधवांचे विवाह |

१८४२ पुणें संस्कृत पाठशाळेस इंग्रजी वर्ग
१८४५ मुंबई व पुणे येथे मुलींची शाळा
१८४५ पुणें येथें अस्पृश्यांकरितां शाळा
१८४८ ज्ञानसारक मंडळी, स्थापना
१८४८ पुणे अनाथ अर्भकांकरतां घर, स्थापना
१८५० काशीनाथ त्रिंबक तेलंग यांचा जन्म
१८५० विष्णूशास्त्री चिपळूणकर यांचा जन्म
१८५३ बहेरामजी मलबारी यांचा जन्म
१८५३ हिंदुस्थानांतील पहिली आगगाडी
१८५६ विधवा विवाहाचा कायदा
१८५६ गोपाळ गणेश आगरकर यांचा जन्म
१८५६ लो. बाळ गंगाधर टिळक यांचा जन्म
१८५७ हिंदुस्थानांतील शिपायांचा उठाव
१८५७ राणीचा जाहिरनामा
१८५८ महर्षि धोंडोपंत कर्वे याचा जन्म
१८६४ शेणवी जातींतील पहिला पुनर्विवाह
१८६५ मुंबई विधवा विवाहोत्तेजक मंडळी स्थापना
१८६५ रामचंद्र विनायक टिकेकर ( धनुर्धारी ) यांचा जन्म
१८६७ मुंबई प्रार्थनासमाज स्थापना
१८६९ पहिला पुनर्विवाह ( मुंबई )
१८७० पुनर्विवाहवाद, पुणे
१८७० पुणे प्रार्थना समाज स्थापना
१८७२ सिव्हिल मॅरेज कायदा
१८७३ सत्यशोधक समाज स्थापना
१८७४ मिश्रविवाहाचा कायदा
१८७५ थिऑसॉफिकल सोसायटी

१८७५ वेदोक्तबद्धर्म विचार

१८८५ दयानंद सरस्वती यांचें पुण येथें आगमन

१८७५ आर्यसमाज स्थापना

१८८१ बालविवष्ठ प्रतिबंधक कायदा

१८८४ हिंदी राष्ट्रीय सभा स्थापना

१८८६ रखमाबाई प्रकरण

१८९०-९१ संमतीवयाचा कायदा

१८९१ पचहौद चहा ग्रामण्य प्रकरण

१८९५ पुनर्विवाहिताचा कुटुंबमेळा ( पुणे )

१८९७ पुनर्विवाहिताचा कुटुंबमेळा ( दुसरा )

१९०१ न्या. मू रानडे याचा मृत्यू

१९०२ वेदोक्त प्रकरण, कोल्हापूर